# जिहाद आणि दहशतवाद

लेखक : डॉ. सय्यद अब्दुल बारी

भाषांतर: खालिद मुल्ला

*"अल्लाह, असीम, दयावंत व कृपावंतच्या नावाने"*

# प्रकरण पहिले

## दहशतवादाची व्याख्या

दहशतवादाचा अर्थ आणि त्याची सर्वमान्य व्याख्या आज पर्यंत कोणीही निश्चित केलेली नाही, तरी पण जगात सर्वदूर "दहशतवाद" या शब्दाचा गवगवा आहे.

ढोबळमानाने एखाद्या प्रबळसत्तेविरुध्दच्या संघर्षास दहशतवाद हे नांव देण्यात येते. हा संघर्ष गनिमी युध्द, पारंपारिक युध्द आणि क्रांतिकारी चळवळ या कोणत्याही प्रकारात मोडत नाही.

पारंपारिक युध्दात शत्रूच्या संख्याबळास आणि युध्द सामुग्रीस पूर्णपणे नष्ट करणे हा उद्देश असतो. गनिमी युध्दामध्ये पारंपरिक युध्दाचे नियम धुडकावून शत्रू गाफिल असताना अचानक हल्ला करून जीवित हानि वा वित्तीय हानि करणे हा उद्देश असतो. क्रांतीकारी चळवळी मध्ये सुध्दा जमेल तशी संधी साधून शत्रूस नुकसान पोचविणे हा उद्देश असतो. परंतु दहशतवादामध्ये मुख्य उद्देश शत्रूला मानसिक धक्का पोचवून भयग्रस्त करणे आणि आपला दबदबा बसविणे हा असतो ज्यामुळे शत्रू भयांकित होऊन त्याची हिम्मत खालावते.

दहशतवादी मुळात कोणताही राजकीय हेतू साध्य करण्याच्या दृष्टीने पाऊल उचलत नाही परंतु एकूण वातावरण आपल्या हेतूकरिता पोषक कसे होईल त्याकरिता जनमानसाचे मत आपल्याकडे आकर्षित करून घेण्याकरिता संघर्षरत असतो. दहशतवादी नाना प्रकारच्या घटना घडवून एक प्रकारचा "मानसिक दबाव" निर्माण करण्याकरिता प्रयत्नशील असतो. प्रबळ सत्तेस असे धक्के देऊन मानसिक दुर्बलतेत लोटणे हा दहशतवादाचा मर्यादित उद्देश असतो. तसे पाहिल्यास गनिमी कावा आणि दहशत वाद यात बरेच साम्य आहे. कारण दोहोमध्ये पारंपारिक युध्दाचे प्रचलित नियम धाब्यावर बसविले जातात. अत्याचाराची प्रत्येक कृती युध्दाचे आंतराष्ट्रीय नियम डावलून केली जाते. दहशतवादात सामील असलेले गट व्यावसायिक जातिवंत लढवय्ये नसतात, फक्त हंगामी कालावधी करिता ते कार्यान्वित होत असतात.

दहशतवादाची सर्व कृत्यें गुन्हेगारी स्वरूपाची असतात. या मध्ये अत्याचार आणि अत्याचाराची धमकी हा केंद्रबिंदु असतो. एक संघटित गट निर्धाराने (पक्क्या इराद्यानिशी) आतंक माजविण्याकरिता व प्रबळ राजसत्ते विरुध्द जनमानस तयार करण्याकरिता ही कृती करतो. दहशतवादाच्या कृतीने सामान्य जनता गर्भगळित होते आणि बळी पण सामान्य निरापराध असुरक्षित जनतेचाच जातो.

दहशतवाद नांव आहे अचानक केल्या जाणाऱ्या अत्यांचारीं हल्ल्याचे. दहशतवाद कधी मर्यादित वैयक्तिक उद्देशाकरिता माजविला जातो तर कधी विशिष्ठ विचारधारा आणि सिध्दांतांकडे लोकांना आकर्षित करून त्यास पांठिबा मिळविण्याकरिता माजविला जातो. सामान्य जनतेच्या झोपी गेलेल्या विवेकास जागृत करणे आणि सत्ताधारी गटामध्ये भय आणि आतंक निमार्ण करणे असा दुहेरी उद्देश दहशतवादाचा असू शकतो. म्हणून दहशतवादाची कारणे पण विस्तृत स्वरूपाची आहेत. बहुतेक करून दहशतवाद राजकीय सत्ता उलथविण्याच्या उद्देशाने के ला जातो. (ज्यामध्ये भावना, आवेश, वंशवाद, जातीयवाद, राजकीय सिध्दांत, विध्वसंक वृत्ती, द्वेष ही कारणे पोषक ठरतात.)

१८५७ साली आपल्या देशात ब्रिटीश साम्राज्याविरुध्द भडकलेली स्वातंत्र्यचळवळ ही इंग्रजाविरुध्दच्या प्रतिशोधाच्या भावनेने केली गेली होती. त्यामुळे क्रांतीकारी गटाने निरपराध वृध्द इंग्रजांना व गोऱ्या मँडमांना आणि कोवळ्या ब्रिटीश बालकांना सुध्दा अत्याचाराला बळी पाडले. भारतीय इतिहासकारांनी याचा निषेध आपल्या लेखनात व्यक्त केला आहे. या काळात आपल्या भारत देशात कित्येक भूमिगत संघटनांनी दहशतवादाचा मार्ग स्वीकारला होता, बळाचा वापर करूनच ब्रिटीश साम्राज्यास आपण संपुष्टात आणू शकतो असा या संघटनांचा विश्वास होता. या पूर्वीचा इतिहास साक्षी आहे की, राणा प्रताप आणि छत्रपती शिवाजी महाराजांनी सुध्दा त्या काळातील परकीय सत्ते विरुध्द गनिमी कावा आणि लूटमारीच्या तंत्राचा अवलंब केला होता. परकीय सत्ते विरुध्दचा हा दहशतवाद आणि अत्याचार समर्थनीय समजला गेला कारण स्वराज्य निर्मितीच्या उदात्त हेतुने तो केला गेला होता. परंतु सध्यस्थितीत प्रस्थापित सत्तेविरुध्द छुप्या मार्गाने केला जाणारा अत्याचार आणि दहशतवाद कदापि समर्थनीय म्हणता येणार नाही, कारण प्रस्थापित सत्ते विरुध्द उघडपणे दंड थोपटून केले जाणारे हे बंड नव्हे !

विसाव्या शतकात आपल्या स्वातंत्र्याकरिता प्रस्थापित सत्तेविरुध्द दहशतवादाच्या मार्गाचा अवलंब करणे क्रांतीकारी गटामध्ये फारच लोकप्रिय झाले आहे. स्वतःला तत्ववादी म्हणविणाऱ्या संघटनांनी सुध्दा याचा अवलंब केला आहे. कालमाना प्रमाणे दहशतवादाच्या रंग, रूपात बरेच बदल झाले आहेत. (विविध देशांत स्वतंत्र भूभागा करिता किंवा आपली विचारप्रणाली बळजबरीने थोपण्यास बहुतेक क्रांतीकारी गट दहशतवादाचा वा गनिमी काव्याचा सर्रास अवलंब करीत आहेत. ही आजची वस्तुस्थिती आहे.)

इंडियन नँशनल सेक्युरिटी गार्ड अँक्ट १९८६ मध्ये दहशतवादाचे वर्णन या शब्दात करण्यात आले आहे.

---

सैध्दांतिक दृष्टया "गनिमी कावा" हा प्रकार कदापि समर्थनीय नाही परंतु परकीय प्रस्थापित सत्ते विरुध्द स्वराज्य स्थापण्याच्या उदात्त हेतुने ते केले जाते म्हणून त्याचे नुसते समर्थन केले जात नाही तर गनिमी काव्याचा अवलंब करणारे आदर्श प्रेरणा स्थान ठरतात ! (भाषांतरकार)

घटने नुसार प्रस्थापित सत्तेविरुध्द एखाद्या व्यक्ति वा गटाने राज्यसत्तेला भयांकित करण्याच्या दृष्टीने किंवा निलंबित करण्यासाठी, किंवा सामान्य नागरिकांना भयग्रस्त करण्याकरिता बॉम्ब, डायनामाईट, ज्वालाग्राही वस्तू, तीक्ष्ण हत्यारे, विषारी वायू, इतर प्राणघातक शस्त्रांचा वापर केला असेल, ज्यामुळे कोणी व्यक्ती जखमी झाला असेल वा मृत्यू पावला असेल, किंवा वित्तीय हानि झाली असेल आणि जीवनोपयोगी सार्वजनिक वितरण व्यवस्था खंडित झाली असेल, तर ती व्यक्ति वा गट दहशतवादी समजला जाईल. *(Countering Terrorism - D. P. Sharma)*

"दहशतवाद" समाजामध्ये आतंक व भयाचे वातावरण निर्माण करून सामान्य जनतेला त्याच विचारसरणीचे समर्थन करण्याकरिता विवश करतो, जी दहशतवादी संघटनेची आहे. नजीकच्या काळातील याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे बाबरी मशीदीचा विध्वंस होय. संघ परिवाराने दहशतवादाचे अनेक सफल प्रयोग केले आणि इतिहासाच्या एका असत्याला सततच्या खोट्या प्रचाराने "भावनिक सत्य" दर्शवून मोठ्या जनसमूहाला विध्वंस आणि तोडफोड करण्याकरिता उद्युक्त केले.

आज कालच्या दहशतवादाने निर्दयतापूर्ण जुलूम आणि विध्वंसाची भयानक व फसवेगिरीच्या चाली वापरल्या आहेत ज्या मध्ये प्रतिष्ठित नागरिकांना बदनाम करण्याकरिता खोटे आरोप करून त्यांचा खून करण्यापर्यंत मजल गेली आहे. व्हिएटनाम मध्ये व्हिएटकॉंगने लैंगिक शोषणाचे खोटे आरोप लावून कित्येक प्रतिष्ठित नागरिकांची हत्या करविली. सामान्य जनतेचे समर्थन प्राप्त करण्याकरिता तसेच लोकांना भयांकित करून दहशतवादास पाठिंबा देण्याकरिता बाध्य करण्यासारखे नीच मार्ग अवलंबिले जातात.

## दहशतवादाचा उगम व इतिहास

दहशतवाद माजविणारा हा बहुतेक करून उच्च मध्यमवर्गीय तरूणांचाच (Upper Middle Class) वर्ग असतो. त्यातील काही तरूण अति श्रीमंत वर्गाचे ही असतात. काही वेळा नैराश्याने ग्रासलेले तरूण आणि अन्यायाच्या एखाद्या घटनेस बळी पडलेले तरूण दहशतवादी गटात सामील होतात. विसाव्या शतकात गोरिला युध्द व गुप्तपणे विध्वसंक कारवाया करण्याचा पहिला प्रयोग पाश्चिमात्य नागरिक टी. ए. लॉरेन्स यांनी केला. पुढे याच तरूणास लॉरेन्स ऑफ अरेबिया म्हणून प्रसिध्दी मिळाली. लॉरेन्स ऑफ अरेबियाने तुर्की खिलाफत नेस्तनाबूत करण्याकरिता "अरब वंशा" च्या बदुआंना वंशवादाच्या नशेत मदमस्त करून तुर्की खिलाफत विरुध्द भडकावून विध्वंसक कारवाया करण्याकरिता उद्युक्त केले. तुर्की खिलाफतच्या दळणवळणाच्या साधनांना विस्कळीत करून अरब गोरिला मुहिमेचे लॉरेन्सने नेतृत्व केले. अशा प्रकारे लॉरेन्स हा दहशतवादाचा पहिला शिलेदार ठरला. विसाव्या शतकातील पहिल्या महायुध्दात गोरिला

युध्दाचे वृक्ष खूप फोफावले. तद् नंतर कम्युनिस्ट चळवळीने हाच लोकप्रिय दहशतवादाचा मार्ग अवंलबिला आणि माओत्सेतुंग हा विसाव्या शतकातील दुसरा गोरिला लीडर ठरला त्याने गोरिला युध्द पध्दतीला दहशतवादाच्या अत्युच्च शिखरावर पोचविले. याच काळात नसुशन (Nasution) ने इंडोनेशिया मध्ये, गियाप (Giap) ने व्हिएटनाम मध्ये ची गोवरा (Che-Guevara) ने लॅटिन अमेरिकेमध्ये दहशतवादाचा अवलंब करून गोरिला युध्द छेडले. गोरिला युध्द पध्दती मध्ये सुरूवातीस ग्रामीण भागात आपले समर्थक अनुयायी तयार केले जातात, जेथे पर्वतीय रांगामध्ये दबा धरण्यासाठी सुरक्षित ठिकाण सहज उपलब्ध होतात. विसाव्या शतकाच्या पहिल्या तीन दशकामध्ये "गोरिला युध्दनीती" ही भयानक आणि घातक समजली जाऊ लागली. या काळात झाडा झुडुपामध्ये लपलेला दहशतवादी आपल्या तीर कमानीने जो बाणांचा वर्षाव करीत असे तो एका मिझाईल (प्रक्षेपणास्त्र) पेक्षा जास्त घातक सिध्द झाला. अशा प्रकारे ग्रामीण भागात शेतकऱ्यांचे आणि जनतेचे छुपे (गुप्त) सैन्य (Peasont's and peoples Army) तयार करण्यात आले ज्यांच्या द्वारे अँटम बाम्ब पेक्षाही जास्त घातक कारवाया केल्या गेल्या. कॅस्ट्रो आणि इतर गोरिला नेत्यांनी शहरापेक्षा ग्रामीण भागाला आपले लक्ष्य बनविले. परंतु कालांतराने विकसित युध्द सामुग्री मुळे सत्ताधाऱ्यांना पर्वतीय रांगा पर्यंत पोचणे शक्य झाले. परिणामी ग्रामीण भागात दहशतवादाचे हे तंत्र प्रभावी राहिले नाही. म्हणून दहशतवाद्यांनी शहराकडे आपला मोर्चा वळविला जेथे सत्ता केंद्रे स्थित होती. शहरी भागात श्रीमंत आणि गरीब यांच्या दरम्यान वाढत गेलेल्या दरीचा दहशतवाद्यांनी लाभ घेतला आणि गरीब वर्गाच्या "वंचित मानसिकते" चा लाभ घेऊन दहशतवादा करिता गरीब वर्गातून मोठ्या प्रमाणात कार्यकर्ते सहज उपलब्ध करून घेतले. त्यामुळे शहरी भागात दहशतवादाला पोषक वातावरण मिळाले.

विसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत व्हिएटनामचा गोरिला नेता राजकीय क्षेत्रात दहशतवादाचे केंद्र माओ समर्थक आणि नव अराजक (Neo Anarchist) बनले. त्यांनी संपूर्ण जगावर कम्युनिस्ट विचारप्रणाली लादण्याचा पक्का निर्धार केला होता. माओत्सेतुंग, लेनिन आणि ची गोयर यांच्या लिखाणाद्वारे दहशतवाद्यांना प्रेरणा आणि उत्तेजन मिळत गेली आणि संपूर्ण जगावर "प्रोलतारी सत्ता" प्रस्थापित करण्याचे मनसुबे दहशतवादी मार्गाने कार्यान्वित केले गेले. आपल्या विचार्सरणीच्या प्रचार व प्रसारासाठी या लोकांनी दहशतवादाचा मार्ग स्वीकारण्यात काही वावगे नाही असे त्यांचे ठाम मत होते. अत्याचारपीडित जनतेच्या हक्कासाठी आणि न्यायासाठी सत्ताधा-या विरुध्द ही लढाई आम्ही लढत आहोत असे भासवून सामान्य जनतेची सहानुभूती मिळविण्यात ते सफल झाले. दहशतवादी हे युध्द स्वतः करिता लढत नसून सामान्य जनतेच्या

भल्यासाठी लढत आहेत असा विश्वास त्यांनी प्राप्त केला होता. त्या काळी माओत्सेंतुंगची ही घोषणा "क्रांती बंदुकीच्या गोळीनेच येऊ शकते" सामान्य जनतेची लोकप्रिय आणि मनाचा ठाव घेणारी ठरली. याच काळात अखंड भारतात दहशतवादी संघटनेचा जन्म झाला; ज्यामध्ये नक्षलवादी संघटना प्रथम क्रमांकावर होती.

वंशवाद आणि जातीयवाद या भस्मासुरा ने जगात कित्येक दहशतवादी संघटना जन्मास घातल्या. जर्मनी त्यांचे सर्वात मोठे केंद्र होते. पश्चिम जर्मनची बादर मिनहॉक (Baader Meinhof) दहशतवादांची सर्वात खतरनाक संघटना होती. तसेच जपानची लालसेनाने (Red Army) लक्षवेधी दहशतवादी कारवाया केल्या. आंतर राष्ट्रीय स्तरावर अरोगोमे, ब्राझील, आयरलँड मध्ये गोरिला युध्दांच्या आणि दहशतवादांच्या भयानक घटना घडल्या. पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मदतीने पॅलेस्टाईन या अरब प्रदेशात बळजबरीने नविन "इस्त्राईल" च्या स्थापनेने आतंकवादाचा हा आगडोंब मध्यपुर्व आशिया पर्यंत पसरला. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतात अनेक दहशतवादी संघटनानी धुमाकूळ माजवून विध्वंसक कारवाया केल्या. डाव्या विचारसरणीच्या दहशतवादी संघटनांशिवाय उजव्या विचारसरणीची एक जागतिक दहशतवादी संघटना "आनंद मार्ग" उदयास आली. आनंद मार्गियांचा आक्षेप असा होता की बहुसंख्य भारतीयावर जुलुम अत्याचार होत आहे ज्यामुळे भारतीय जनता हतबल आणि विकलांग झाली आहे. म्हणून जनतेला जागृत करणे अनिवार्य आहे त्याकरिता दहशतवाद हाच एकमेव मार्ग आहे. याच काळात पंजाब मध्ये शीख अतेरिकी पूर्वभारत सरहद्दीवर नागालँड आणि आसाम मध्ये अल्फा चळवळ यांच्या दहशतवादी कारवाया सुरू झाल्या. त्यामुळे बेसुमार माणसे जिवास मुकली. भारतातील बेरोजगारी, भ्रष्टाचार, न्याय मिळण्यास अनेक अडचणी, या कारणास्तव फार मोठा तरूण वर्ग या दहशतवादी चळवळींकडे आकर्षित झाला.

विसाव्या शतकात दहशतवादी गटांनी हृदय कंपित करणारे प्राणघातक हल्ले केले. १९७२ ते १९७४ या काळात लंडनमध्ये लिबरेशन आर्मी ऑफ आर्यलंड या दहशतवादी गटाने बॉम्बस्फोट घडवून शेकडो निरापराध जनतेची हत्या केली. अमृतसर येथे चार स्त्रियांना फक्त संशयित समजून त्यांची कत्तल करण्यात आली आणि रॉकेल टाकून त्यांची शवे नष्ट करण्यात आली. कालोघात दहशतवादा मध्ये खूप बदल झाले. कधी स्वत: क्रांतीकारक म्हणवून तर कधी आमची विचारसरणी स्वीकारा म्हणून दहशतवादी घटना घडविल्या. जागतिक स्तरावर आता दहशतवादास धंदेवाईक स्वरूप प्राप्त झाले आणि दहशतवाद घडविण्यास जागतिक बाजार पेठेत "भाड्याचे दहशतवादी" मिळू लागले.

# प्रकरण दुसरे

## भारतात दहशतवाद

स्वातंत्र्यपूर्व काळात ब्रिटीश साम्राज्यवादा विरुध्द भूमिगत कारवाया आणि सशस्त्र चळवळी स्वातंत्र्याकरिता होत होत्या. परंतु या चळवळीत रानटीपणा किंवा क्रोर्य नव्हते. स्वातंत्र्योतर काळात दुर्दैवाने कांही संघटना कडून क्रूरता पूर्ण अतिरेकी आणि दहशतवादी घटना घडल्याचे इतिहास नमूद करतो. बाहेरील कांही दहशतवादी संघटनांनी या देशात आपला अड्डा बनविण्याचे प्रयत्न केले, परिणामी याच देशातील त्यांचे समर्थक गट आणि जत्थे निर्माण झाले. स्वातंत्र्यपूर्व काळात भारतीय समाजात अध्यात्म आणि चारित्र्य यांचा मनावर पगडा होता. शिक्षण पध्दतीत नीतीमत्ता, एकात्मता, बंधूभाव याचे पाठ दिले जात होते ज्यामुळे अत्याचार आणि द्वेष अशा दुर्गुणांना सामाजिक मान्यता नव्हती. तरी पण समाजात काही घटक असे होते किंबहुना विसाव्या शतकाच्या सुरूवातीस असे घटक उदयास आले, ज्यांनी सांस्कृतिक व धार्मिक भेदभावास हवा देऊन द्वेष आणि शत्रुत्वाची बीजे समाजात रूजविली. विशेषतः राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक हेडगेवार आणि हिंदूमहासभेचे बॅ. सावरकर यांच्या प्रक्षोभक विचाराने द्वेष आणि शत्रुत्वाच्या भावना भडकविल्या आणि पुढे याचे रूपातंर दहशतवादात झाले आणि सांप्रदायिक दंग्यांची दुर्दैवी मालिका सुरू झाली.

भारत देशात ज्या मोठ्या दहशतवादी संघटनांनी डोके वर काढले त्यात आंनद मार्ग ही संघटना लक्षणीय ठरली या शिवाय खलिस्तान चळवळ, जम्मू कश्मीर लिबरेशन फ्रंट या सशक्त दहशतवादी संघटना नावारूपास आल्या. नागालँड, मणिपूर, मिझोराम, त्रिपुरा आसाम या पूर्व उत्तरीय भागात विदेशी दहशतवादी संघटनांच्या मदतीने भारतीय दहशतवादी गट विध्वंसक कारवाया करीत होते. उदाहरणार्थ प्रोफेज़ नागा फेडरल गव्हर्नमेंट (NFG), प्रोतीन नॅशनल सोशालिस्ट कौन्सिल ऑफ नागालँड (NSCN), युनाईटेड लिबरेशन फ्रंट ऑफ आसाम (ULFA), आसाम पीपल्स लिबरेशन आर्मी (APLA), बोडो अल्ट्राज, झारखंड अक्टीविस्ट इत्यादी, सारांश, भारताच्या सीमा प्रातांत दहशतवादी संघटनांना खूप बळ मिळाले. कम्युनिस्टांनी पण बरेच अत्याचारी दहशतवादी गट जन्माला घातले या सर्व दहशतवादी गटांना चीन पासून प्रेरणा मिळत होती.

## आनंद मार्ग

स्वातंत्र्यानंतर सर्वात पहिली दहशतवादी संघटना राष्ट्रीय स्वंयसेवक संघ होती आणि दुसरी अतिरेकी संघटना "आनंद मार्ग" होती. १९५५ मध्ये जमालपूर (बिहार) येथे पी. आर. सरकार (आनंदमूर्ती) यांनी ह्याची स्थापना केली. ही व्यक्ती स्वतःस ईश्वराचा अवतार म्हणत असे; आणि त्याच्या शिष्यांची अशी अंधश्रध्दा होती की आनंदमूर्ती मध्ये दिव्य शक्ती आहे. त्याच्या शिष्यात उच्चशिक्षित तरुणांचा भरणा होता, ज्यांनी आपले सर्वस्व जीवन या कार्यास वाहून टाकले.

याचे मुख्य केंद्र कलकत्ता शहर होते. १९९० साली त्यांनी "आनंदनगर" वसविले, जे पुढे या संघटनेचे जागतिक केंद्र बनले. ख्रिस्ती धर्म झुगारून परदेशातून आलेली

तरूण मंडळी मोठ्या प्रमाणात या संघटनेत सामील झाली. आनंदमार्गातल्या आपल्या अनुयायांना दर्ज्यानुसार विविध वर्गवारीत विभागले होते. उदाहरणार्थ साधक, तातोक, आचार्य, अवधूत, कापालक, प्रवधा या वर्गवारीत परस्पर आकर्षणाचे मुख्य कारण रहस्यमय बंधुत्व आहे. आनंद मार्गी सर्व मानवास एक "वैश्विक मानवीय एकता" समजतात. परंतु आपल्या सारखा एक मानव पी. आर. सरकार यास ईश्वर मानतात (!) यांच्या उपासने मध्ये "तपश्चर्ये" ची साधना, सामाजिक सेवा आणि विशिष्ट प्रकारच्या पारंपारिक तांत्रिक नृत्याला मोठे स्थान आहे. हिंसाचारात त्यांचा विश्वास आहे; ज्यामुळे ते दहशतवादास उद्युक्त होतात. हिंसाचाराच्या मार्गाने संपूर्ण जगात क्रांती करून एक "नवीन सामाजिक व्यवस्था" कायम करण्याची त्यांची इच्छा आहे. आनंदमार्ग संघटनेत "मतभेद" हा अक्षम्य गुन्हा आहे. १९७१ साली अकरा आनंद मार्गीयांना याच गुन्हयाकरिता मृत्यू दंडाची शिक्षा देण्यात आली होती. या कारणास्तव पोलिसा तर्फे भारतीय न्यायालयात त्यांच्या म्होरक्या विरुध्द न्यायालयांत खटला चालला आणि त्यास जन्मठेपेची शिक्षा सुनावण्यात आली आणि १९७८ साली हायकोर्टाने त्याची सुटका केली. आनंद मार्ग तत्कालीन पंतप्रधान इंदिरा गांधीचा कट्टर विरोधक होता.

परदेशात आनंदमार्ग संघटना "योगा" च्या माध्यमातून खुपच लोकप्रिय होती. १९९१ साली संस्थापक पी.आर. सरकारच्या मृत्यूसमयी परदेशात या संघटनेचे एक लक्ष सदस्य होते. तायवान आणि मेक्सिको देशात त्यांनी जागतिक अधिवेशने भरविली. त्यांची एक शाखा प्रौटिस्ट फेडेरेशन होतो, जी युरोप आणि अमेरिकेत कार्यरत होती. डेव्हिड फिल्टन (आचार्य देवी जागना) बर्लिन सेक्टर मध्ये मुख्य म्हणून कार्यरत होता, त्यांनी मान्य केले होते की, आनंद मार्गीयांच्या विरोधकांना संपविण्याकरिता "भाडोत्री मारेकरी" यांची सेवा प्राप्त करण्यात आली होती. १९८३ साली एका प्रौटिस्ट सदस्याने पंतप्रधान राजीव गांधी यांना जीवे मारण्याची उघडपणे शपथ घेतली होती. ही संघटना हिंसाचारास अनिवार्य समजत असे म्हणून परराष्ट्र वकिलाती आणि राजनीतीतील अतिमहत्वाच्या व्यक्तींची हत्या व विध्वंसक कृत्ये करण्याचे मनसुबे त्यांनी रचले होते. जगातील इतर विविध गोरिला संघटनांशी त्यांचे घनिष्ठ संबंध होते आणि सर्व संघटनाचे "सामान्य केंद्र" म्हणून आनंद मार्ग ची ख्याती होती असे त्यांचे प्रसिध्द पुस्तक Anarchist cook Book (अनार्किस्ट कुक बुक) मध्ये नमूद करण्यात आले आहे.

बंगाल मध्ये अमरा बंगाली (Amra Bangali) नांवाची एक शाखा प्रस्थापित झाली होती जी स्वतंत्र बंगालिस्तान निर्माण करण्याची इच्छुक होती. शस्त्रे जमविण्या करिता ती कार्यरत होती आणि परदेशातून शस्त्रे आयात करताना कार्यकर्ते पकडले गेले. कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) (C.P.M) शी त्यांची चकमक उडाली ज्यामुळे त्या प्रदेशात कायदा आणि सुव्यवस्थेचा जटिल प्रश्न निर्माण झाला होता.

## नक्षलवादी चळवळ

स्वातंत्र्योत्तर काळात भारतात साम्यवादी चळवळीचे विविध गट अस्तित्वात आले. ज्यांचा लोकशाही प्रणाली पेक्षा हिंसाचारात दृढविश्वास होता. १९८७ साली डाव्या बाजूचे असे ३५ अतिरेकी गट होते. आंध्रप्रदेश आणि बिहार मध्ये झालेल्या विध्वंसक कृत्यांपैकी

नव्वद टक्के विध्वंस यांच्याच कृत्यांचा परिपाक होता. या एकाच वर्षी हिंसाचाराच्या ५१५ घटना घडल्या. डाव्या विचारसरणीच्या या अतिरेकी गटांनी मोठ्या जमीनदारांच्या जमीनी बळजबरीने बळकाविण्याची मोहीम चालविली, त्यास जनते कडून उत्स्फूर्त समर्थन मिळाले. २३ मे १९६७ ला नक्षलबाडी गांवात हिंसाचारा मुळे परिस्थिती इतकी आटोक्याबाहेर गेली की कम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया (मा.) (CPIM) ला सक्त कार्यवाही करणे भाग पडले नवल याचे आहे की, चीन ने त्याच्या रेडिओ प्रसारणात नक्षल वाद्यांचे अभिनंदन केले, आणि या घटनेस वसंत ऋतु च्या मेघ गर्जनेची उपमा दिली. परिणामी कम्युनिस्ट पार्टी मध्ये दुसऱ्यांदा फूट पडली. या क्रांतिकारकानी पुढे जाऊन (AICCCR) च्या नावांने एक समन्वय समिती गठित केली आणि सर्वांच्या समन्वयाने २२ एप्रिल १९६९ ला कंम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया (CPT) अस्तित्वात आली चारू मुजूमदार चमत्कारिक नेत्याच्या रूपाने उदयास आले आणि नक्षलवादी चळवळीच्या लाटा कलकत्त्यापासून सिरीका कोलम (आंध्राप्रदेश) पर्यंत पोचल्या. नंतर या संघटनेच्या विविध शाखा स्थापित झाल्या. त्या सर्वामध्ये हिंसाचार आणि बळतंत्राने क्रांति करण्याचा आवेश फोफावला आणि "माओइट कम्युनिस्ट मिनिस्टर" (MCC) सर्वात जहाल सशस्त्र गट म्हणून नावांरूपास आला. १९८७ साली या जहाल गटाने शेकडो हिसांचारी कारवाया केल्या. या गटाच्या कारवाया आंध्रप्रदेश आणि बिहार पर्यंत सीमित होत्या. या जहाल गटाने प्रशासन आणि कायद्याच्या सरंक्षकांना इतके भयभीत केले की, प्रशासन आणि कायदा ठप्प झाला. डाव्या विचारसरणीच्या अतिरेकी संघटनांनी जनतेची मानसिकता, अडचणी व समस्या यास लक्ष्य बनवून संघर्ष सुरू केला. उदाहरणार्थ, सांप्रदायिकतेमुळे निर्माण झालेली कटुता, जमिनीचा वाद आणि जमीनवाटपाची समस्या, मजूरांना किमान वेतन, कृषी उत्पन्न मध्ये शेतकऱ्यांना कमाल नफा इत्यादि.

या अतिरेक्यांनी टेलिफोन एक्सचेंस, बिनतारी संदेश व्यवस्था, रेल्वे लाईनी याना लक्ष्य करून विध्वंस आरंभिला आणि बँका लुटल्या व सरकारी बसेस आणि खाजगी दुकाने लुटली. हा विध्वंस विसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकापर्यंत जारी होता, परंतु प्रसार माध्यमांनी या घटनांना विशेष महत्व दिले नाही. किंवा या उपक्रमास कोणत्याहि परदेशी विचारसरणीशी वा संघटनेशी संबंधित असल्याचे दर्शविण्याचा प्रयत्न केला नाही. विश्वसनीय अहवाला नुसार फक्त १९९० या वर्षी हिंसाचाराच्या १५७५ घटना घडल्या, ज्यापैकी बहुसंख्य घटना आंध्रप्रदेश आणि बिहार मध्ये घडल्या, जेथे डाव्या विचारसरणीचे गट आणि नक्षलवादी प्रकर्षाने कार्यरत होते. हे वादळ विशेष करून आंध्रप्रदेश तेलंगण भागात उसळले. बिहार राज्यात पालमावू आणि जहानाबाद मध्ये झालेल्या हत्या सर्वाधिक होत्या. शिवाय महाराष्ट्र आणि मध्यप्रदेशात "पीपल्स वॉर ग्रुप" कार्यरत होता. या एकाच वर्षी १३८ लोकांची कत्तल करण्यात आली आणि १४९ जण इतर कारणामुळे मृत्यूमुखी पडले. उपरनिर्दिष्ट राज्यामध्ये आणि विशेषतः आंध्रप्रदेशात राजकीय नेत्यांच्या अपहरणाच्या घटना घडल्या. या अपहरणात डाव्या विचारसरणीच्या क्रांतीकारकांची विशेषचाल होती. या व्यतिरिक्त, हे अतिरेकी गट बारूदी सुरूंगे पेरण्यात निपुण होते. नवल या गोष्टीचे वाटते

की, या अतिरेक्यांना देशद्रोही ठरविण्याची किंवा शेजारी राष्ट्रांच्या हातांचे बाहुले म्हणण्याची हिम्मत या देशातील सत्ताधारी दाखवू शकले नाही, या विपरीत हेच नेते एका विशिष्टसमूहा कडून झालेल्या छोट्याश्या घटनेने आकाश-पाताळ एक करतात, जणु कांही शेजारच्या राष्ट्राने या देशावर हल्ला केला की काय ?

डाव्या विचारसरणीने प्रभावित या नक्षलवादी गटा कडून गोरिला युध्दाचे युध्दतंत्र वापरले जाते. ग्रामीण भागातील दूरवरचे एखादे खेडेगांव "स्वतंत्र" घोषित करून तेथे ते आपले केंद्र प्रस्थापित करतात व पुढील संघर्ष चालू ठेवतात. नक्षलवादी चळवळीची संघटनात्मक रचना फारच प्रभावशाली आणि सुसूत्र असते. त्याची एक केंद्रीय समिती असते, त्या खालोखाल राज्य स्तरिय आणि जिल्हा समिती असतात मोठ्या शहरांची "शहरसमिती" असते. सर्वात छोटे युनिट ३ ते ९ सदस्यांचे असते. संघटने अंतर्गत सर्व कारभार लोकतंत्रावर आधारित असतो. बहुतेक गटांमध्ये एक "सशस्त्र दल" असतो. या दला मध्ये ६ ते १३ सदस्य असतात. डिसेंबर १९९१ चा वर्षाच्या संघटना अहवालानुसार पीपल्स वॉर ग्रुपचे हजारों सदस्य जिल्हा व गांव पातळीवर होते आणि त्यांच्या सशस्त्रदलाने त्वरीत आणि प्रभावशालीरित्या त्यांच्या योजनांची अमंलबजावणी केल्याचे आढळते.

गोरिला प्रशिक्षण शिबीरात चार हजार अतिरेकी एकाच वेळी प्रशिक्षण घेतात. मार्गासवर्गीय तथा आदिवासी वर्गात पी.डब्ल्यू.जी (पीपल्स वॉर ग्रुप) चा विशेष प्रभाव आहे. हा गट गुप्त ठिकाणी वास्तव्य करतो आणि कार्यवाही करिता दक्षतापूर्वक बाहेर पडतो. कार्यवाही करिता निधी श्रीमंत जमीनदार आणि ठेकेदाराकडून गोळा केला जातो किंवा बँका आणि सरकारी खजिने, पोस्ट ऑफिसांवर दरोडा टाकून प्राप्त केला जातो. बेरोजगारांना काम आणि वित्तीयलाभ ही मानसिकता अशा कारवाया करिता प्रेरक ठरते. या दृष्टीने पाहिल्यास डाव्या विचारसरणीच्या क्रांतीकारकाचे विचार-आचार आणि प्रशिक्षण व्यवस्था तथा मानसिक तयारी हे रहस्यमय गूढ आहे. मनुष्य हा एक विचित्र प्राणी आहे, जी गोष्ट मनात प्रभावशालीरित्या बिंबविली जाते आणि सातत्याने त्याबाबत उपदेश केला जातो, ती पूर्णत्वाला नेण्याकरिता मग तो जिवाची ही पर्वा करीत नाही. डाव्या विचारसरणीचे धोरणी नेते आपल्या कॅडरचे लक्ष विशिष्ठ लक्ष्यावर केंद्रित ठेवण्यात फारच पक्के ठरले आहेत. सतत वैचारिक खाद्य पुरवून ते आपल्या अनुयायांना आपल्या ताब्यात ठेवतात. नेतेपणाची खुबी ही आहे की, ते सामान्य सदस्यासोबत राहण्यास आणि जेवण्यास कमीपणा लेखीत नाहीत. आपल्या नेत्यांच्या त्याग भावनेने आदिवासी, अनुसूचित जाती, आणि गरीब शेतकरी प्रभावित होतात. तसेच संघटनेत सामान्य सदस्याना मिळणाऱ्या राजकीय, आर्थिक व सामाजिक समतेने नवीन सदस्य भारावून जातात. अत्याचार पीडित वर्गाकरिता दिल्या जाणाऱ्या बलिदानाच्या फलस्वरूप तरूण वर्ग मोठ्या प्रमाणात या संघर्षात उडी घेतात. डाव्याबाजूच्या विचारसरणीच्या या चळवळी त्या भागात फोफावल्या जेथे नव्वद टक्के जनता गरीबी आणि जुलमाच्या जोखडात जीवन कंठीत आहे. शतकानु शतके ते व्याजबट्टयाने गब्बर झालेल्या महाजनांचा आणि श्रीमंत जमीनदारा कडून होणारा अत्याचार सहन करीत आहेत. शिवाय वनाधिकारी आणि पोलिस अधिकारी यांची जुलुमज्यादती त्यांच्या दैनंदिन जीवनाचा एक भाग झाली आहे. नक्षलवादी या पीडित लोकाकरिता मसीहा ठरले, जे श्रीमंत

जमीनदारांकडून पैसा प्राप्तं करून कल्याणकारी योजने करिता खर्च करतात. तसेच मागास वर्गीय लोकांचे आपापसातील तंटे मिटवितात. अशा प्रकारे ही संघटना सरकारच्या मठ्ठ-मुर्दाड प्रशासनाची पोकळी भरून काढते.

नक्षलवादी गट आपल्या सदस्यांना निरंतर शस्त्र, दारूगोळ्याचे प्रशिक्षण देतात आणि त्यांच्या वास्तव्याचे ठिकाण गुप्त ठेवतात, जेथे त्यांच्या मानसिक व बौध्दिक प्रशिक्षणाचे वर्ग चालविले जातात. तेथे गोरिला युध्द तत्रांचे धडे दिले जातात आणि त्याकरिता लागणारे शस्त्र व दारूगोळा सरकारी यंत्रणेकडून हस्तगत केला जातो. तसेच परदेशातून आयात केला जातो ह्या बद्दलचे प्रशिक्षण त्यांना दिले जाते. मानवाने मानवावर केलेला अत्याचार व कहर समाप्त करून एक शोषणरहित समाजाचे निर्माण या घोषणे मध्ये फार मोठे आकर्षण आहे.

विसाव्या शतकाच्या शेवटी रशिया आणि चीन या साम्यवादी राष्ट्राकडून त्यांना मिळणारी मानसिक व भावनिक रसद बंद झाली आणि त्यांचे सुंदर स्वप्न भंग पावले. ज्या साम्यवादाच्या सिध्दातांवर त्यांचा दृढ विश्वास होता, ज्या सामाजिक न्यायावर त्याना भरवसा होता तो डळमळीत झाला परिणामतः त्यांच्या चळवळींना पूर्णाविराम मिळाला.

आता जे कोणी शेष राहिले आहेत त्यांचे विखुरलेल्या कम्युनिस्ट गटांशी संबंध आहेत आणि मर्यादित स्वरूपात या संघटनांच्या कारवाया आज पण जारी आहेत.

## उत्तर पूर्व भारतातील अतिरेकी गट

या भूभागातील अतिरेकी गट १९५० साला पासून संघर्षरत आहेत. आसाम व पश्चिम बंगालच्या उत्तरपूर्व सीमेवरील राज्ये नागालँड, मिझोरम, त्रिपुरा, मणिपूर, दार्जिलिंग येथे अलगाववाद (पृथकस्वतंत्र राज्य) प्रिय संघटना हिंसाचाराच्या मार्गाने कार्यरत आहेत. मागील ५० वर्षांचा त्यांचा इतिहास आहे. त्यापैकी कांही अतिरेकी संघटनानी आपला मार्ग बदलला असून सामान्य सामाजिक प्रवाहात त्या सामील झाल्या आहेत. तरी पण कांही संघटना आपल्या जुन्या पठडीवरच कायम आहेत.

नागालँड अतिरेकी नेता "फिजो" ने ग्रेटब्रिटन मध्ये आश्रय घेतला असून भारत सरकार च्या "आम माफी" च्या घोषणाचा लाभ घेत त्याच्या गटाने ११ नोव्हेंबर १९७५ ला भारतसरकारशी समेट करून शिलाँग करार केला आहे. परंतु एका गटाने हे मान्य न करता नॅशनल सोशालिस्ट कौन्सिल ऑफ नागालँड (NSCN) स्थापन केली. या गटाने शांतीपूर्ण माध्यमाने समस्या सोडविण्यावर विश्वास ठेवणाऱ्या नेत्यांची हत्या केली. या गटाने चीन मध्ये गोरिला युध्दाचे प्रशिक्षण घेतले होते. या गटाने शेकडों लोकांना आणि भारतीय फौज तथा आसाम रायफल्स ला खूप क्षति पोचविली. हा गट भारतापासून वेगळा होऊन स्वतंत्रभूमि निर्माण करण्याची मागणी करीत होता आणि एक इंच जमीन भारतात सामील न करता "नागा सार्वभौम" कायम करण्यावर अडून होता. नंतर अंतर्गत मतभेदामुळे NSCN मध्येच गृहयुध्द झाले आणि शंभर गोरिला मारले गेले, ज्यामुळे त्यांच्यात दोन गट निर्माण झाले. त्यांचे केंद्र ब्रहमदेशात होते. खपलांग च्या गटात एक हजार सशस्त्र सदस्य होते आणि दुसऱ्या विरुध्द

गटात सहाशे सदस्य होते. दोन्ही गट आपापल्या वेगळ्या प्रयत्नातून नागाभूमीच्या स्वातंत्र्याकरिता संघर्षरत होते. दक्षिम ब्रहमदेश (मियानमार) च्या निळ्या पर्वत रांगामध्ये जिथे पोचणे कठिण होते, अशा दुर्गम भागात त्यांची ठावठिकाणी होती. उल्फा बोडो अतिरेक्यांचे प्रशिक्षण NSCN च्या या शिबीरात होत असे जे दुर्गम पर्वत रांगा मध्ये स्थित होते.

## मणिपूर

या प्रदेशात पीपल्स लिबरेशन आर्मी (PLA) आणि पीपल्स आर्मी ऑफ क्लालिंग पाक या दोन संघटनांनी भारत सरकार विरुध्द सशस्त्र लढा चालू ठेवला होता. हे दोन्ही गट माओ समर्थक आहेत. या व्यतिरिक्त युनाईटेड नेशनस लिबरेशन फ्रंट (UNLF) चीनी सैन्याच्या मदतीने मणिपूर ला स्वतंत्र करू इच्छित होता. या गटाने १९९० साली स्वतंत्र जाहीरनाम्याच्या प्रती वाटून मणिपूरच्या जनतेस बाहेरील लोकाकडून होणाऱ्या चुकीच्या प्रचारापासून सावध राहण्याचे आणि आपल्या परंपरा आणि संस्कृतीचे सरंक्षण करण्याचे आवाहन केले होते. साठेबाजी, ब्लॅक मार्केटिंग पासून दूर राहण्याचे तसेच "दिल्लीच्या दरोडेखोरा (Delhi Bandits) पासून सावध राहण्याची विनंती जनतेस त्यांनी केली होती. या गटाच्या बरोबरीने इतर विविध अतिरेकी गट निर्माण झाले होते, उदाहरणार्थ, रेव्होलुशनरी गर्व्हमेंट ऑफ मणिपूर, आय पी के एफ (IPKF) इत्यादि विशेष करून PLA फारच प्रभावी होती ज्याने विसाव्या शतकाच्या अंतिम दशकात भारतीय फौजे विरुध्द निरंतर रक्तलांछित चकमकी केल्या.

## आसाम चे अतिरेकी (Militants)

१९७८ साली विदेशी नागरिका विरुध्द मोहिम चालविण्याच्या हेतुने आसाम गण परिषद हा पहिला अतिरेकी गट आसाम मध्ये निर्माण झाला. तेजपूरचा रहिवाशी "अरपन बाज बारूच" ने आसाम पीपल्स लिबरेशन आर्मी (APLA) या नावांने हा अतिरेकी गट स्थापन केला. त्यांनी मणिपूरची पीप्लस लिबेरशन आर्मी (PLA), नागालँड ची (NSCN) (नँशनल सोशालिस्ट कौसिल ऑफ नागालँड) आणि मिझोरामचा (M.N.P.) गट यांच्याशी संबंध प्रस्थापित केले. १९८३ साली आसाम विधानसभेच्या निवडणुकीच्या वेळी विविध दहशतवादी कारवाया केल्या, व पोलिस अधिकाऱ्यांना ठार केले. विविध अतिरेकी गटा तर्फे विदेशी नागरिकां विरुध्द उसळलेल्या संघर्षामध्ये हा गट सहभागी झाला आणि १९८३ साली ULFA (युनाईटेड लिबेरशन फ्रंट ऑफ आसाम) मध्ये सामिल झाला.

महाविद्यालयीन विद्यार्थ्यांनी १९७९ साली उल्फा (ULFA) ही संघटना निर्माण केली. त्यांनी नागाबंडखोरा कडून शस्त्रास्त्र आणि प्रशिक्षण प्राप्त केले, अशा प्रकारे ते चीनी बनावटीच्या शस्त्रास्त्रांनी सज्ज झाले. १९९० साली या संघटनेत ६०० प्रशिक्षित सशस्त्र सदस्य होते. सशस्त्र लढ्याद्वारे ते आसाम राज्यास भारतापासून स्वतंत्र करू इच्छित होते, तसेच इतर सरहदी राज्यांचे सरंक्षण करू इच्छित होते. उल्फा ने ब्रहमदेश, भूतानच्या पर्वतीय प्रदेशात आणि अरूणाचल व नागालँड येथे आपली प्रशिक्षण केंद्रे उभारली. विशेष म्हणजे

उल्फाने स्त्रियांना पण सहभागी करून त्यांना दहशतवादाचे प्रशिक्षण दिले. १९९० पर्यंत प्रशिक्षित स्त्री-पुरुष सदस्यांची संख्या दोन हजाराच्या घरात गेली. आसाम मध्ये विदेशी नागरिकांविरुध्द कार्यरत असलेल्या अतिरेकी गटाकडून तसेच आसाम राज्य सरकाराकडून त्यांना पुष्कळ पाठबळ मिळत राहिले. उल्फा या दहशतवादी संघटनेने राज्याच्या विविध भागात मोठ्या प्रमाणात निरापराधांचा बळी घेतला.

उल्फाने NSCN तथा KIA यांच्या कडून मोठ्या प्रमाणात शस्त्रास्त्रे हस्तगत करून नागालँडच्या सरहद्दीवर आपले "शस्त्र कोठार" स्थापन केले. आसामी जनतेत आसाम गण परिषद सरकारची लोकप्रियता घटत गेली तशी उल्फा पुन्हा जोमाने संघर्षरत झाली. परेश बरुआ यांच्या नेतृत्वात बिगर आसामी व्यापाऱ्यांची आम कत्तल झाली शिवाय काँग्रेस (आय) आणि युनाईटेड मायनारिटीज फ्रंट मध्ये असलेल्या लोकांची आम कत्तल उल्फाने केली, चहा मळ्यांचे मालक ठार केले गेले. संघटनेच्या निधी करिता बिगर आसामी व्यापाऱ्याकडून विशेषतः मारवाडी व्यापाऱ्याकडून बळजबरीने पैसा जमविण्यात आला. जनतेची सहानुभूती प्राप्त करण्याकरिता भ्रष्ट अधिकारी आणि समाजशत्रू समजले जाणाऱ्या घटकांना कडक शिक्षा दिल्या, विशेष करून स्त्रियाची बेअब्रू, मद्यपान, जुगार सट्टा या सारख्या समाजघातकी कृत्यांविरुध्द मोहिम चालविली. आसाम गण परिषद राज्य सत्तेवर असताना उल्फाचे ब्रहमदेशातील आवागमन, अरूणाचल व नागालँड मार्गे शस्त्र-दारूगोळ्याची तस्करी सर्रास चालू होती. १९८६ ते १९९० या काळात राज्यपोलिसांनी २६६ उल्फा दहशतवाद्यांना अटक केली ज्यामुळे उल्फाच्या दहशतवादी कारवाया आणखी वाढल्या. १९९० साली राष्ट्रपति राजवट असताना उल्फा आणि NSCN वर सरकार तर्फे बंदी घालण्यात आली. उल्फाची प्रशिक्षण केंद्रे उध्वस्त करण्यात आली आणि १९९० साली BNL उल्फा सदस्यांची मोठ्या प्रमाणात धरपकड करण्यात आली व त्यांच्याकडील तीन हजार घातक शस्त्रें जप्त करण्यात आली परंतु उल्फाचे नेते अटक होऊ शकले नाहीत आणि ते ब्रहमदेशात पळून गेले.

## बोडोलँड चळवळ

स्वातंत्र्योत्तर काळात आसामच्या दारांग जिल्हा आणि खोखराझार व उदलगिरी तालुक्यातील आदिवासी टोळ्या खासीगारो, जेन्टिया, मिझो आणि नागा यांनी आसाम राज्याची विभागणी करून स्वतंत्र राज्ये निर्माण करण्याची मागणी केली, त्यानुसार काही छोटी राज्ये निर्माण केली गेली, परंतु बोडोलँड वेगळे राज्यस्थापन होऊ शकले नाही. परिणामी १९६७ साली ऑल बोडो स्टुडंट युनियन (A.B.S.U.) स्थापन करण्यात आली. "प्लेन ट्राईबल कौसिल ऑफ आसाम या संघटनेची फ्रंट म्हणून बोडो युनियन नावां रूपास आली. कालांतराने १९७७ साली ती प्लेन ट्राईबल कौसिल ऑफ आसाम पासून विभक्त झाली. पुढे जाऊन दोघामध्ये रक्तलांछित चकमकी झाल्या. १९८९ साली तीन-चार नवे अतेरिकी फ्रंट उभारले गेले, ज्यामध्ये गोरखा नॅशनल लिबरेशन फ्रंट (GNLF) ने लक्षणीय कामगिरी बजावली आणि राज्य सरकाराकडून आपल्या बहुतेक मागण्या पदरी पाडून घेतल्या. तरी पण स्वतंत्र बोडो लँडची मागणी कायम राहिली तसे बोडो भाषेचा देशाच्या प्रमुख भाषेत समावेश करण्याची मागणी सातत्याने ते करीत राहिले.

या आदिवासी टोळ्या धनुष्यबाणा व्यतिरिक्त ज्वालाग्राही दारू गोळ्यांचा वापर करीत असत. बोडो दहशतवादी स्वतःस खाकी आणि काळ्या रंगाच्या वर्दीने वेगळे दर्शवीत असत. गोरिला युध्दतंत्राचा वापर करून आपल्या मागण्या पुढे रेटण्याचा मार्ग त्यांनी स्वीकारला होता. १९९० साली त्यांची एक शाखा "नॅशनल गार्ड" या नांवाने सशस्त्र लढा देण्याकरिता निर्माण झाली.

## झारखंड चळवळ

बिहार राज्यात जंगलाने व्याप्त प्रदेशातील आदिवासी टोळ्या एक स्वतंत्र राज्य बनविण्या करिता फार पूर्वीपासून मागणी करीत आले होते. ब्रिटीश राजवटीत १९३८ साली "आदिवासी महासभा" निर्माण झाली होती. पुढे १९५० साली त्याचे रूपांतर "झारखंड पार्टी" म्हणून झाले. १९५२ च्या सार्वजनिक निवडणुकी बिहार राज्य विधान सभेत त्यांचे ३२ (बत्तीस) आमदार निवडून आले होते. १९६३ साली झारखंड पार्टी काँग्रेस पक्षात विलीन झाली, परंतु आपला हेतु साध्य नझाल्यामुळे पुढे "झारखंड मुक्ति मोर्चा" आणि इतर छोटे फ्रंट निर्माण झाले. या आदिवासी लोकांनी आपल्या मागण्या करिता दहशतवादाचा मार्ग अवलंबिला, तसेच लोकशाही मार्गाने पण प्रयत्नशील राहिले. ऑल झारखंड स्टुडंट युनियन हा एक सशक्त गट म्हणून उदयास आला आणि त्यांनी आपल्या सदस्यांस सशस्त्र प्रशिक्षण देणे सुरू केले, आदिवासी सदस्य मात्र आपल्या धनुष्यबाणावरच निर्भर होते. या गटाने अल्पसंख्याक आणि इतर जातीवर भयानक अत्याचार केले. शेवटी २००० साली स्वतंत्र झारखंड राज्य अस्तित्वात आले.

## पंजाब मधील अतिरेकी

या वस्तुस्थितीचा कोण इन्कार करील की, भारतात संघर्षरत असलेल्या विविध अतिरेकी संघटनेत शिखांची अतिरेकी संघटना दहशतवाद आणि रक्तलांछित विध्वसंकाच्या दृष्टीने सर्वात खतरनाक संघटना ठरली. या संघटनेने निवडक प्रतिनिधीची कत्तल, विध्वंस, तोड फोड, रेल्वे लाईनी उखडून टाकणे, बँका लुटणे, सरकारी इमारती व प्रवाशी गाड्यांना आगी लावणे, विमान अपहरण अशी अत्याचारी कृत्ये करून जनतेला भडकावून त्यांची सहानुभूती प्राप्त केली. शिखांचे एक वेगळे राष्ट्र असावे हीच त्यांची आकर्षक व लोकप्रिय घोषणा होती. बर्मिंगहॅम (ग्रेटब्रिटन) शहराचा रहिवाशी ग्यानी बक्षीस सिंह या नक्षलवादी नेत्याने स्वतंत्र शीख राष्ट्राची कल्पना शीखांमध्ये रूजविली. *(Countering Terriorism - By D. P. Sharma)*

बक्षीस सिंह हा ग्रेट ब्रिटन येथे शिरोमणी अकाली दलाच्या स्वतंत्र खालिस्तान चळवळीचा जनरल सेक्रेटरी होता. स्वातंत्र्योत्तर काळात संत फतेह सिंहानी शिखामध्ये "निरंकारी" धार्मिक गट निर्माण केला होता. त्याने शिखांच्या मूळ श्रध्दे बाबत मतभेद निर्माण करून आपला प्रबळ धार्मिक गट स्थापिला होता.१९७८ साली या निरंकारी गटाने रक्तलांछित चकमकी घडवून हिंदूना ठार केले आणि शीखामध्ये अनेक दहशतवादी गट उदयास आले. निरंकारी शिखांच्या विरोधात संत भिंडरावाला स्वतंत्र खालिस्तानची आकर्षक मागणी घेऊन पुढे आले आणि अकाल तख्त सुवर्ण मंदिरावर आपले निर्विवाद

वर्चस्व सिध्द केले. संपूर्ण पंजाब स्वतंत्र खालिस्तानच्या घोषणेने दुमदुमले आणि सशस्त्र लढ्याची सुरूवात झाली. १९८१ साली तत्कालीन पंतप्रधान इंदिरागांधी यानी भारतीय फौजेद्वारे ऑपरेशन ब्ल्यूस्टार (Operation Blue Star) घडवून संतभिंद्रावाला ला जेर केले, ज्यामध्ये शेकडो शीख मारले गेले. ऑपरेशन ब्ल्यू स्टार ची तीव्र प्रतिक्रिया संपूर्ण शीख समाजात उमटली आणि त्याचा बदला घेण्यास्तव ३१ ऑक्टोबर १९८४ रोजी इंदिरा गांधीची क्रूर हत्या करण्यात आली. ऑपरेशन ब्ल्यूस्टार नंतर बहुतेक शीख अतिरेकी संघटना भूमिगत झाल्या होत्या परंतु १९८५ साली पंजाब मध्ये दहशतवादाच्या भयंकर घटना घडल्या. जम्बोजेट कनिष्क प्रवाशासह बॉम्बने उडविण्यात आला त्यात शेकडो प्रवाशी प्राणास मुकले. दिल्ली येथे श्रीललित माखन ची क्रूर हत्या करण्यात आली. १९८६ साली दहशतवादाच्या दोन हजाराच्या वर भयंकर घटना घडल्या. १९८७ साली दहशतवादाच्या विविध घटना मध्ये १२४६ लोक बळी गेले. आणि १९८८ साली दहशतवादाच्या हजारो घटना घडल्या ज्या मध्ये २५०० लोक प्राणास मुकले.

भारत सरकारने पंजाब मधील उग्र दहशतवाद संपविण्याचे शक्यतो प्रयत्न केले परंतु परिस्थिती बिघडतच गेली. दहशतवादी गटांच्या नेत्यांच्या अटके मुळे प्रतिक्रिया म्हणून दहशतवाद जास्तच उफाळला गेला परिणामी दहशतवादी घटनांमध्ये असिमीत वाढ झाली. १९८८ साली दहशतवाद्यांनी सुवर्ण मंदिरात आपला प्रभाव वाढविला आणि त्याच्या आश्रयाने आपल्या कारवाया चालू ठेवल्या. शेवटी भारतीय सेनेने ऑपरेशन ब्लॅक थँडर सुरू केला आणि सेनेने सुवर्ण मंदिरातून सशस्त्र अतिरेक्यांना हाकलून दिले, आणि काही प्रमाणात दहशतवाद काबूत आणला. परंतु १९८९ साली दहशत वाद्यांनी परत उचल खाल्ली व त्या वर्षात दहशतवादाच्या १८२७ घटना घडल्या आणि १४०० निरपराध प्राणास मुकले.

या दहशतवादी गटांना, पाकिस्तान, इंग्लडं, कँनडा अमेरिका आणि युरोप स्थित शिखा कडून मुबलक आर्थिक मदत आणि नैतिक बळ मिळत राहिले. जगातील इतर विविध गोरिला दहशतवादी संघटना कडून "स्वतंत्र खालिस्तान" च्या स्थापने करिता समर्थन मिळाले. दहशतवादी गटा मध्ये "बब्बर खालसा" ला नामी प्रसिध्दी मिळाली. तलबंदर सिंग परमार (कँनडाचे रहिवाशी) यांनी बब्बर खालसा करिता विध्वसंक कारवाया केल्या तसेच रक्तपात घडविले. त्याच प्रमाणे जगजीत सिंग चौहान आणि गंगासिंग ढिल्ला ने स्वतंत्र खालिस्तान चळवळीस परदेशातून पोषक कारवाया केल्या. पंजाब मध्ये शीख अतिरेक्यांना शस्त्रास्त्राच्या बाबतीत विशेष सरशी प्राप्त झाली होती. पाकिस्तानने पंजाबच्या दहशतवादी गटांना भरपूर मदत केली, कारण भारताने बांगला देश निर्मितीत जी भूमिका निभावली होती त्याचा बदला घेण्याकरिता पाकिस्तानला ही उत्तम संधी चालून आली होती. दहशतवादी गटांनी भारतीय सेनेस आपले लक्ष्य ठरविले भारतीय सैन्याकडून दहशतवादी गटांना अनेक प्रकारे अत्याचार सहन करावा लागला व दहशतवादी गटाचे लक्षणीय मनुष्यबळ मृत्युमुखी पडले.

बब्बर खालसा व्यतिरिक्त खालिस्तान लिब्ररेशन फोर्स (KLF) खालिस्तान कंमाडो फोर्स (K.G.G.) आणि भिंद्रावाला टायगर्स फोर्स ऑफ खालिस्तान (B.T.F.K.) या प्रबळ दहशतवादी संघटना उदयास आल्या. शीख अतिरेक्यांच्या कारवाया उत्तरप्रदेशाच्या तराई भागा पर्यंत विस्तारित झाल्या, विशेष करून रेल्वे लाईनींना लक्ष्य

ठरवून विध्वसं माजविण्यात आला. या शीख अतेरिकी गटांनी उल्फां (आसाम) .NSCN (नागालँड) JKLF (जम्मू काश्मीर) या इतर दहशतवादी संघटनांशी संबंध प्रस्थापित केले. केंद्रात काँग्रेस सत्तेतून पायउतार झाल्यानंतर या दहशतवादी संघटनांच्या कारवाया थंडावल्या आणि त्यांच्यात परस्पर मतभेद सुरू झाले या अतिरेकी गटापैकी एक गट भा.ज.पा. च्या निकट आला आणि नंतर पंजाब शांत झाला.

## 'जम्मू व कश्मीर मधील दहशतवाद व अत्याचार

भारत स्वतंत्र झाल्यानंतर लगेचच कश्मीर प्रकरण जटिल समस्या व कठिण प्रश्न म्हणून समोर आला. भारत आणि पाकिस्तान दरम्यान रक्तपात घडला. स्वतंत्र कश्मीर करिता या भूभागात संघर्ष सुरू झाला १९६४ साली "जम्मू-कश्मीर लिबरेशन फ्रंट" उदयास आला ज्याचे सर्वोसर्वा मकबूल बट आणि मेजर अमानुल्ला खाँ होते. ही संघटना जम्मू-कश्मीर मधील जनते करिता स्वप्रशासनाचा हक्क मागत होती. भारत सरकारने १९६६ मध्ये मकबूल बट ला अटक करून मृत्यू दंडाची शिक्षा सुनावली परंतु १९६८ साली मकबूल बट जेल मधून फरार झाला आणि JKL फ्रंट च्या दहशतवादी कारवाया सुरू ठेवल्या, ज्यामध्ये विमानांचे अपहरण सामील आहे. १९७०-७१ या काळात विध्वंस व दहशतवादाच्या विविध घटना घडविल्या १९७१ साली मकबूल बटला दुसऱ्यांदा अटक करण्यात आली.

१९७० साली JKLF ने गोरिला युध्द तंत्रा द्वारे कश्मीर स्वतंत्र करण्याचा निर्णय घेतला. भारतीय कश्मीर मध्ये भारतीय सेनेचा जुलुम, कश्मीरी जनतेची गरिबी, बेरोजगारी या कारणामुळे कश्मीर च्या अशांती मध्ये वाढ झाली, कश्मीरी जनता त्रासून गेली. १९८३ साली कोपिन हेगिन मध्ये भारताचे पंतप्रधान इंदिरा गांधी विरुध्द आनंद मार्ग या जहाल संघटने च्या सोबतीने JKLF यांनी तीव्र निदर्शन केले. १९८४ साली मकबूल बट ला फांशी देण्यात आली. अमानुल्ला खाँला ब्रिटन मधून निष्कासित करण्यात आले. १९८८ साली जम्मू-कश्मीर पीपल्स लीगची स्थापना झाली या संघटनेने स्वतंत्र कश्मीर ची मुहिम कौशल्याने चालविली. शब्बीर शाह आणि मुहम्मद अल्ताफ़ लीगचे नेतृत्व करीत होते. १९८९ साली शब्बीर शाह ला अटक करण्यात आली. स्वतंत्र कश्मीर मोहीम चालविण्या करिता इस्लामिक स्टुडंट लीग (I.S.L.) उदयास आली त्या व्यतिरिक्त जम्मू-कश्मीर स्टुडंट लिबरेशन फ्रंट, मुजाहिदी, कश्मीरग्रुप आणि हिज्बुल्लाह या विविध संघटना कश्मीर स्वातंत्र्याची मोहीम चालवीत होत्या. देशातील इतर दहशतवादी संघटने च्या तुलनेत या संघटनांच्या विध्वंसक कारवाया मर्यादित होत्या परंतु सिक्युरीटी फोर्सेस, पोलिस आणि कश्मीरचे भारत समर्थक राजनीतिज्ञ विरुध्द त्यांचा संघर्ष तीव्र होता. विदेशातून कश्मीर समर्थक या गटांना शस्त्रास्त्रे आणि आर्थिक मदत करीत होते. भारत आणि पाकिस्तान च्या नेत्यांनी हा जटिल प्रश्न हाताळण्या मध्ये जी दिरगांई चालविली आहे व परस्पर वाटाघाटी नेहमीच असफल ठरल्यामुळे कश्मीर मध्ये दहशतवाद फोफावण्यास कारण मिळाले आणि JKLF ला कश्मीरी जनतेची सहानुभूती मिळाली.

दुर्दैवाने या संघटनांच्या कारवाया पेक्षा भारताच्या सिक्युरिटी फोर्सेस ने निरापराध जनतेवर जुलूम-अत्याचार चालविला आहे असे प्रतिपादन करून जागतिक मानव हक्क अभियानाने या जुलुम अत्याचारा बद्दल तीव्र नापसंती आणि निषेध व्यक्त केला आहे.

(१) अरबस्तानच्या उत्तर सीमेवर एक शहर

(२) अरबस्तानच्या दक्षिण सीमेवरील यमन देशानी राजधानी

# प्रकरण तिसरे
## इस्लाम आणि दहशतवाद

अत्याचार आणि इस्लाममध्ये विस्तव आणि पाण्याचे वैर आहे. जेथे अत्याचार आहे तेथे इस्लामची कल्पना सुध्दा केली जाऊ शकत नाही आणि जेथे इस्लाम आहे तेथे अत्याचाराची सावली सुध्दा पडू शकत नाही. इस्लाम शांती आणि सुव्यवस्थेचे स्त्रोत आहे आणि मानवा - मानवात प्रेम तथा बंधुत्व वृध्दिंगत करणारा धर्म आहे. या उलट जुलूम, बळजबरी तसेच रानटीपणातून अत्याचाराचा जन्म होतो. रक्तपात आणि विध्वंसाने अत्याचारास खतपाणी मिळते. जगातील प्रचलित सर्व धर्म आणि संस्कृती मध्ये मानवी जीवास (मानवीप्राणास) असाधारण सन्मान प्राप्त आहे. मानवाने शांती, समाधान आणि निर्भयतेने जीवन जगावे हा प्रत्येक मानवाचा मूलभूत जन्मसिध्द हक्क आहे. हा हक्क देण्याबाबत प्रचलित धर्मात इस्लाम प्रथम क्रमांकावर आहे. प्रत्येक मानवास प्रतिष्ठेने जीवन जगण्याचा हक्क आहे असे ईश्वरीय ग्रंथ कुरआन आणि अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कथनात स्पष्ट आदेश आहेत. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आणि कोणत्याहि जिवाला, ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे, ठार करू नका, परंतु न्याय-संगत (असेल तर) *(सुरे अनआम आयत १५१)*

"याच कारणास्तव बनी-इस्त्राईल करिता आम्ही हे फर्मान लिहिले होते की, ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीतलावर उपद्रव पसरविण्या व्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणु कांही सर्व मानवांना ठार केले आणि ज्याने कोणाला जीवदान दिले त्याने जणु कांही सर्व मानव जातीला जीवदान प्रदान केले.

*(सूरह मायदा आयत ३२)*

अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांची हदीस आहे.

महापापा मध्ये सर्वात मोठे महापाप हे आहेत की अल्लाह (ईश्वर) सोबत कोणास सहभागी करणे (२) मनुष्याचा जीव घेणे (३) मात्या-पित्याची अवज्ञा करणे (४) खोटे बोलणे *(रावी : अनस बिन मालिक (रजि.)*

दुसऱ्या एका हदीस मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) फर्मावितात मोमिन आपल्या धर्माच्या विस्तारामध्ये बरोबर असतो जो पर्यंत त्याच्या हातून हकनाक रक्त सांडले जात नाही. *(रावी : अब्दुल्लाह बिन उमर रजि)*

इस्लामच्या आदर्श शिकवणीचा प्रभाव आणि परिणाम म्हणूनच २५ वर्षाच्या अल्पावधीत रानटी अरब टोळ्या सुसंस्कृत झाल्या. प्रसिध्द इस्लामी संशोधक मौलाना मौदूदीच्या शब्दात :-

"पाव शतकाच्या अल्पावधीत रक्तपिपासु अरब इस्लामी संस्काराने मानवी जीवाचा सन्मान करणारे व शांतीपूर्ण व न्यायपूर्ण प्रशासक झाले. मुहम्मद पैगंबरानी वर्तविलेल्या भविष्यवाणी नुसार एकटी एक स्त्री कादसिया पासून सनाअ पर्यंत बिनधास्त

प्रवास करू शकली आणि तिच्या जिवालां आणि मालमत्तेला कोणतीही हानि पोचविण्याचे धाडस कोणी करू शकले नाही; जेव्हा की, पंचवीस वर्षापूर्वी मोठमोठे व्यापारी काफिले असा सुरक्षित प्रवास करु शकत नव्हते"

आदर्श इस्लामी शिकवणीची ही पुण्याई होती की, जगात मानवी प्राणाच्या प्रतिष्ठेचे आश्चर्यजनक दृश्य दृष्टी समोर आले आणि त्या काळी महासत्ता म्हणवणाऱ्या रोम आणि इराण मध्ये मानवी जीवाशी होणाऱ्या क्रूर घटना आणि खेळल्या जाणाऱ्या क्रूर क्रीडा एकदम बंद झाल्या मानवीय समाजाला दहशतवाद आणि रक्तपात्ता पासून मुक्ती मिळाली, इस्लाम पूर्वी गुलामांना जनावराप्रमाणे बळी देणे व हिंस्त्र पशूच्या पिंजऱ्यात गुलामाना फेंकून त्यांच्यावर अत्याचार करणे राजक्रीडा समजली जात असे. कैद्यांना क्रूर पणे ठार करणे त्या महासत्तांना आनंद देणारा आवडता छंद होता. या रानटी व क्रूर प्रकारावर इस्लाम ने बंदी घातली. ग्रीस, रोम, इराण या सुसंस्कृत म्हणवणाऱ्या देशा मध्ये मानवी जीवास क्षुल्लक कारणासाठी सहज ठार करणे वैध समजले जात असे.

*(अलजिहाद-फिल-इस्लाम पृष्ठ २७ - मौलाना मौदूदी)*

अतिसुसंस्कृत गणल्या जाणाऱ्या ग्रीस देशात पित्याने आपल्या संततीस ठार मारणे गुन्हा समजला जात नसे. पती आपल्या पत्नीस पाळीव जनावराप्रमाणे बळी देत असे, त्याकरिता त्या सुसंस्कृत संविधानामध्ये कोणतीही शिक्षा नव्हती. भारतीय समाजात पतीच्या चितेवर विधवा पत्नीस जिवंत जाळणे पुण्यकार्य समजले जात असे. शूद्र समाजातील स्त्रीपुरूषांना किड्या मुंगी प्रमाणे भरडले जात असे. इस्लामी शिकवणीच्या प्रसाराने या पाशवी व रानटी प्रथा तात्काळ संपुष्टात आल्या, कारण इस्लामची घोषणाच अशी होती की, कोणत्याही मानवाची हत्या करणाऱ्यास मृत्यु दंडाची शिक्षा दिली जाईल. मानवीय हत्या फक्त न्याय्य प्रकरणात न्यायासाठीच करता येईल.

इस्लामने मानवाचा हा जन्म सिध्द हक्क मान्य केला आहे की कोणीही, कोणताही धर्म, केव्हाही स्वीकारू शकतो. बळजबरीने कोणावर धर्म थोपण्यात येऊ शकत नाही. इस्लाम आपल्या मूलभूत श्रध्दा व शरीअतचा प्रसार व प्रचार करण्याच्या बाबतीत फारच सहिष्णु आहे.

सूरह बक़रा मध्ये अल्लाह फर्मावितो :-

"धर्माच्या बाबतीत कोणतीही जोर-जबरदस्ती नाही. सत्य असत्यापासून वेगळे केले गेले आहे. आता ज्याने कोणी, तागूतचा इन्कार करून अल्लाहवर श्रध्दा ठेवली त्याने एक असा मजबूत आधार ग्रहण केला जो कधी तुटणार नाही."

*(सूरे बक़रा आयत २५६)*

---

पाश्चिमात्य इतिहासकाराने इस्लाम धर्माचा प्रसार तलवारीच्या जोरावर झाला असा दुष्प्रचार केला आहे ते सर्वस्वी अवास्तव आहे.

तागूत - अल्लाह शिवाय इतर उपास्य

सूरह यूनुस मध्ये अल्लाह फ़र्मावितो :-

"जर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा अशी असती (की पृथ्वीतलावर सर्व श्रध्दावंत व आज्ञाधारकच असावेत) तर सर्व भूतलवासियांनी श्रध्दा ठेवली असती, मग तू लोकांना भाग पाडशील का की ते श्रध्दावंत बनतील ?" *(सूरे यूनुस आयत ९९)*

या ईश्वरीय संदेशानुसार कोणावर इस्लाम धर्म स्वीकारण्यास बळजबरी केली गेली नाही, याची साक्ष इतिहास देत आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे पवित्र जीवन साक्ष देत आहे की त्यांनी इस्लाम स्वीकारण्याचे सर्वांना आवाहनच केले. धमकी देऊन कोणास इस्लाम स्वीकारण्यास विवश केले नाही. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या अनुयायांनी सुध्दा हाच आदर्श मार्ग अवलंबिला. दुसरे खलीफ़ा उमर (र.) आपल्या कर्मचाऱ्यांना व गुलामांना इस्लाम स्वीकारण्याचे आवाहन करीत असत परंतु एखाद्याने त्यास नकार दिल्यास ते म्हणत दीन (धर्म) मध्ये जोर-जबरदस्ती नाही आणि त्याला नोकरीवरून काढले जात नसे.

इस्लामी दृष्टया मुस्लिम समाजामध्ये मतभेद संपुष्टात आणण्याकरिता बळाच्या वापर करण्यास मनाई करण्यात आली आहे तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावर किंवा त्याच देशातील इतर विविध धर्मियांविरुध्द उच्च दर्ज्याच्या परोपकाराची शिकवण देण्यात आली आहे. कुरआनच्या सूरह मुमतहिना मध्ये अल्लाह फर्मावितो.

"अल्लाह तुम्हाला या गोष्टीची मनाई करीत नाही की तुम्ही त्या लोकांशी सद व्यवहार आणि न्यायाचे वर्तन करावे, ज्यांनी धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युध्द केले नाही आणि तुम्हाला तुमच्या घरांतून बाहेर काढले नाही. अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंत करतो. तो तुम्हाला ज्या गोष्टीची मनाई करतो ती तर ही आहे की, तुम्ही त्या लोकांशी मैत्री करावी ज्यांनी तुमच्याशी धर्माच्या बाबतीत युध्द केले आहे आणि तुम्हाला तुमच्या घरांतून बाहेर काढले आहे आणि तुम्हाला बाहेर घालविण्यात एक दुसऱ्यास मदत केली आहे. त्यांच्याशी जे लोक मैत्री करतात तेच अत्याचारी आहेत."[१]

*(सूरह मुमतहिना आयत ८ व ९)*

धर्मा संबंधी कधी प्रत्यक्ष युध्द होतात तर कधी अप्रत्यक्ष कारस्थाने होतात, या बाबतीत इस्लाम समेट किंवा तह करू इच्छित नाही, कारण हे इस्लामी तत्वप्रणाली विरुध्द उघड बंड तरी असते किंवा इस्लामी शिकवणी मध्ये भेसळ करण्याचा प्रयत्न असतो. हे वाईट प्रवृत्तींस व जुलुम-अत्याचारास सहकार्य करण्या सारखे ठरेल. सूरह माइदा मध्ये ईश्वराचा आदेश आहे.

"जे काम ईशपरायणतेचे (सत्कर्म) आहे, त्यामध्ये सर्वाशी सहकार्य करा आणि जी पाप व अत्याचाराची कामे आहेत, त्यामध्ये कोणाशीही सहकार्य करू नका. अल्लाहच्या कोपचे भय बाळगा, त्याची शिक्षा फार कठोर आहे." *(सूरे मायदा - आयत २)*

---

१. मक्केतील कुरैशच्या संर्दभात हे कथन आहे ज्यांनी मुसलमानावर अत्याचार करून त्यांना स्थलांतरास बाध्य केले.

धर्माच्या बाबतीत शत्रुशी तो "तह" इस्लामला मान्य नाही जो ईशआशेच्या विपरीत स्वैराचार, दुष्कर्म आणि अत्याचाराला खत-पाणी घालून शक्तीशाली करण्यास कारणीभूत ठरू शकतो. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"अल्लाह न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो आणि दुष्कर्म व स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो, तो तुम्हाला उपदेश करतो, जेणे करून तुम्ही बोध घ्यावा". *(सूरह अनूनहल आयत ९०)*

श्रध्दा, धर्म आणि मैलिक मुल्यांना व्यक्तीने मुलभूत हक्क म्हणुन स्वीकारण्यास आधुनिक पाश्चिमात्य संस्कृति तयार नाही. "व्यक्ती स्वातंत्र्य" या त्यांच्या घोष वाक्यानुसार व्यक्ती कांहीही, कशीही योग्य व अयोग्य कृत्य करू शकतो. जर सुज्ञांनी त्यांच्या या अयोग्य वर्तणुकी विरूध्द आक्षेप घेतला तर त्यांना कट्टरपंथी, मुलतत्ववादी, वेडा अशा उपहासत्मक उपाध्या दिल्या जातात.

धार्मिक श्रध्देनुसार एकनिष्ठ राहून पूर्ण संयमाने आदर्श आचारसंहिताचे तंतोतंत पालन करणे पश्चिमात्यांच्या दृष्टीने गुन्हा आहे; त्यांचा शब्दकोशात अशी एकनिष्ठता व संयम 'फॅसिझम' व 'टेररीजम' पेक्षा जास्त घातक आहे. शोकांतिका अशी आहे की, संपूर्ण जगातील गरीब, दलित न्यूनगंड-पीडित लोक पश्चिमात्यांच्या या चुकीच्या विचारसरणीस प्रतिसाद देतात. निकटच्या काळातील उदाहरण म्हणजे सलमान रश्दी ने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या बाबत केलेले गलिच्छ लिखाण होय. सलमान रश्दीने आपले पुस्तक (The Satamic verses) सॅटॅनिक व्हर्सेस" मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या बाबत पाखंडी व उपद्रवी लिखाण केले, जे कोणत्याहि सुसंस्कृत समाजात सहन केले जाण्यासारखे नव्हते परंतु पाश्चिमात्यांनी त्याची निंदा करावयाची सोडून "अभिव्यक्ति स्वातंत्र्य" चा डांगोरा पिटून त्याचे नुसतेच समर्थन केले नाही, तर त्याची प्रशंसा केली, आणि ज्या मुस्लिम समाजाच्या भावना दुखविल्या गेल्या, त्यांनी या निंदनीय लिखाणाचा जगभर निषेध केला तेव्हा व्यक्ति स्वातंत्र्याच्या हक्काची कोल्हे कुई करत ज्यू, ख्रिस्ती प्रसार माध्यमे पेटून उठली.

इस्लाम अतिरेक व दहशतवाद याच्या विरुध्द शांती आणि विश्व बंधुत्व या सदगुणांना किती महत्व देतो याचे प्रत्यंतर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या शेजारील राजांना त्या काळी लिहिलेल्या पत्रावरून येते. या महासत्तानी आपल्या जनतेस गुलाम करून व्यक्ति स्वातंत्र्य व आचार विचाराच्या स्वातंत्र्या पासून वंचित केले होते. हर्क्यूलस रोम आणि किसरा अज़ीम (इराणचा राजा) यांना उद्देशून लिहिलेल्या पत्रामध्ये आश्वासित करण्यात आले होते की, नजीकच्या काळात होणाऱ्या क्रांती बाबत सकारात्मक भूमिका स्वीकारून तुम्ही सुरक्षित आणि शांतीपूर्ण राहू शकाल. या पत्रामध्ये स्पष्ट करण्यात आले होते की, एकेश्वरवादाचा स्वीकार करावा आणि मूर्तिपूजा त्यागावी.

---

१ अंतिम प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तत्कालीन महासत्ता इराण आणि रोम च्या राजांना पत्र लिहून इस्लाम स्वीकारण्याचे आवाहन केले होते. तसेच जनतेला त्यांच्या इच्छेनुसार सत्यधर्म स्वीकारण्यास आडकाठी न करण्याबद्दल फर्मान काढले होते.

प्रेषित मुहम्मद (स.) मक्केहून हिजरत करून मदीनेला आल्यानंतर तेथील "ज्यू" लोकांशी सन्मानजनक करार केला. तसेच मदिनेला आलेल्या नजरानच्या ख्रिस्ती शिष्टमंडळाशी वाटाघाटी करून त्यांच्याशी करार केला. हा सर्व इतिहास साक्ष देतो आहे की एक आदर्श समाजाची जडण घडण प्रेषित मुहम्मद (स.) यांनी शांतीपूर्णरित्या केली. इस्लामच्या सुरुवातीच्या काळात चार आदर्श खलिफांनी जो विजय प्राप्त केला, त्यांच्या सैन्याला स्पष्ट सूचना देण्यात आल्या होत्या की, बंडखोर म्हणून जे तुमच्या विरुध्द शस्त्र उचलणार नाहीत त्यांच्या जीवाची व मालमत्तेची सुरक्षितता तुमची प्रथम जबाबदारी राहील तसेच स्त्रियां आणि बालकांवर पण शस्त्र उगारले जाऊ नये. हा सर्व इतिहास सांगतो आहे की, इस्लामी संस्कृतीत अतिरेक व पाशवी अत्याचाराला बिल्कुल थारा नाही. हा पाश्चिमात्य इतिहासकारांचा खोडसाळपणा आणि दूषित मनोवृत्तीच म्हणावी लागेल ज्यांनी निर्लज्जपणे प्रचार केला की इस्लामचा प्रसार तलवारीच्या जोरावर झाला आहे.

जुलुमाच्या विरुध्द आवाज उठविणे आणि जालीम (अत्याचारी) समोर सत्यवचन बोलणे हेच पक्क्या मुसलमानाचे वैशिष्टय इस्लामने ठरविले आहे. येथूनच जिहाद आणि बलपूर्वक जुलुम मिटविण्याचे ध्येय-धोरण सुरू होते. पाश्चिमात्य ओरियंटलिस्टांनी (Orientalist) इस्लामच्या ध्येय धोरणाला लक्षपूर्वक समजुन न घेता "जिहाद" चे हास्यास्पद स्पष्टीकरण आपल्या परीने केले. त्यांनी इस्लामच्या शांतताप्रिय ध्येय धोरणाशी असंबध्दता दर्शवून जिहादचा संबंध रक्तपात, अत्याचार आणि विध्वंसाशी जोडण्याचे षडयंत्र रचले. इस्लामने जेथे मानवी जीवाच्या सन्मानाची घोषणा केली तेथे उपद्रव माजवून आणि दंगा भडकावून मानवी जीवांचा बळी घेणाऱ्यास कधीच क्षमा केली नाही. मौलाना मौदूदी (र.) जिहाद विषयी लिहिलेल्या प्रसिध्द पुस्तकात प्रतिपादन करतात,

"जगाला वास्तविक गरज याची नव्हतीच की, एखाद्या व्यक्तिस कायद्याच्या बंधनातून मुक्त करून त्यास मानवी समाजात अत्याचार करण्याची व अनाचार तथा अशांती पसरविण्याची मुभा दिली जावी. उलट वास्तविक गरज याची होती की असे प्रभावी कायदे प्रस्थापित करावेत जेणेकरून व्यक्ती आपल्या मर्यादेत स्वतंत्र जरूर असावा. परंतु मर्यादा ओलांडून व्यक्तीने दुसऱ्याच्या भौतिक आणि अध्यात्मिक साधनेत हस्तक्षेप करू नये. जगात शांतता प्रस्थापित व्हावी आणि दंगेधोपे तथा उपद्रव मुळासकट संपुष्टात आणले जावेत". *(अलजिहाद फिल इस्लाम - मौलाना मौदूदी)*

जुलुम - बळजबरी, दंगेधोपे, उपद्रव याचे सामूहिक स्तरावर समूळ निराकरण करण्याकरिता "जिहाद" चे आदेश देण्यात आले आहेत. जिहादचा उद्देश फक्त प्रतिस्पर्ध्यास नुकसान पोचविणे किंवा ठार मारणे हा नसून उपद्रव शमविणे आणि दुराचारास प्रतिबंध घालणे आहे. म्हणूनच इस्लामचा युध्दसिध्दांत असा आहे की, उपद्रव समूळ नष्ट करण्याकरिता जितकी शक्ती लागते तेवढीच शक्ती युध्दात वापरली जावी आणि युध्द फक्त बंडखोरांच्याच विरुध्द केले जावे किंवा उपद्रव माजविणाऱ्या घटका पुरतेच युध्द मर्यादित असावे, इतर सामान्य नागरिका विरुध्द कोणतीही कारवाई करता कामा नये.

---

१ Orientalist इस्लाम धर्मावर संशोधन करणारे पाश्चिमात्य तत्वज्ञानी

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पवित्र जीवनाचा सविस्तर अभ्यास केल्यास इस्लामी शिकवणीच्या मुशीतून तयार होणाऱ्या समाजाचे चित्र आपल्या समोर येईल. ज्या समाजात आपण राहतो त्या समाजात परस्पर दंगे-धोपे, अत्याचार, विध्वंस होणे इस्लामला अमान्य आहे. म्हणून मक्का येथे मुसलमानावर होणाऱ्या अनन्वित अत्याचाराचे उत्तर संयम आणि सबूरी ने अत्याचार सहन करून आपल्या ध्येयाकरिता शातंतामयरित्या प्रयत्नशील राहण्याने देण्यात आले. ज्या समाजात आपण राहतो, त्या समाजात जुलूम अत्याचार माजविला जात असेल तर त्याविरुध्द गोरिला युध्द करण्याच्या प्रयत्ना बाबत इस्लामी विचारवंत असा निष्कर्ष काढतात की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मक्केतील जीवनापासून बोध घ्यावा. तेथे सतत १४ वर्षे मुसलमानावर अत्याचार व जुलुम करण्यात आले. या चौदावर्षात प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अत्याचार व जुलुम सहन करीत इस्लाम पसरविण्याचे आपले कार्य सतत चालू ठेवले आणि स्वतः मुसलमानांना अत्याचाराचे उत्तर अत्याचाराने न देण्याची शिकवण दिली. मक्केच्या सरदारांनी मुसलमानांचा अनन्वित छळ केला. सामाजिक बहिष्कार घेरावबंदी, अत्याचार - जुलुम हत्या या भयानक यातना मुसलमानांना सहन कराव्या लागल्या. हा संघर्ष फक्त याच एका कारणामुळे होता की प्रेषित मुहम्मद (स.) कुप्रवृत्ती पासून त्यांना रोखत होते आणि अढळ एकेश्वराची श्रध्दा दृढ करून त्या समाजातून अनेकेश्वरवादाची चुकीची श्रध्दा, अत्याचार जुलुम समूळ नष्ट करू इच्छित होते. उमर (र.) आणि माननिय हमजा (र.) सारख्या प्रभावशाली सरदारांनी इस्लाम स्वीकारल्यानंतर अत्याचाराचे प्रत्युत्तर अत्याचाराने देणे काही अवघड नव्हते तरी पण प्रेषित मुहम्मद (स.) यांनी संयम आणि सबूरीची दीक्षा दिली कारण कुरआन मध्ये या प्रसंगी पैगंबरांना हेच आदेश देण्यात आले होते.

"आपल्या पालनकर्त्याच्या नामाचे स्मरण करीत जा आणि सर्वापासून अलिप्त होऊन त्याचेच बनून रहा. तो पूर्व व पश्चिमेचा स्वामी आहे. त्याच्या शिवाय कोणीही ईश्वर नाही, म्हणून त्यालाच आपला मुखत्यार बनवा आणि ज्या गोष्टी लोक बनवीत आहेत त्यावर धैर्य राखा आणि सभ्यतेने त्यांच्यापासून वेगळे व्हा.

*(सूरह मुजम्मिल आयती ८ ते १०)*

"हे मुहम्मद (स.) सांगून टाका की, "लोक हो ! तुमच्यापाशी तुमच्या पालन कर्त्या कडून सत्य आलेले आहे. आता जो सरळ मार्ग अनुसरील त्याचे सदवर्तन त्याच्या साठीच हिताचे होय आणि जो मार्गभ्रष्ट राहील त्याची मार्गभ्रष्टता त्याच्या साठीच विनाशकारी आहे. आणि मी तुमच्यावर कांही हवालदार नाही" आणि हे पैगंबर ! तुम्ही मार्गदर्शनाचे अनुसरण करीत रहा जे तुमच्याकडे दिव्य प्रकटन (वह्य) द्वारे पाठविले जात आहे आणि संयम राखा इथपोवतो की अल्लाह निर्णय करील आणि तोच सर्वोत्तम निर्णय लावणारा आहे."

*(सूरह यूनुस आयती १०८ व १०९)*

हिजरत (देशाटन) करून मदीन्याला गेल्यानंतर अत्याचाराचे प्रत्युत्तर शक्तीनिशी देण्याची मुभा मिळाली जेव्हा मदीनेत एक आदर्श इस्लामी समाज निर्माण झाला होता आणि त्या आदर्श समाजास मक्केच्या अनेकेश्वरवाद्यांपासून हल्ल्याचा धोका होता.

डॉक्टर अब्दुल हमीद अबू सुलैमान आपले पुस्तक "अतिरेक आणि राजकीय संघर्ष" यात लिहितात.

"कुरआननुसार त्यांना स्वतःचे आणि स्वतःच्या धर्म प्रचाराचे संरक्षण करण्याचा आदेश व मुभा मिळाली आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांनी कुरैश सकट त्या सर्व अरब टोळ्यांचा पाठलाग केला जे पैगंबराचे आणि त्यांच्या धर्माचे कट्टर विरोधक होते. पैगंबराची ही कृती त्यांच्या व त्यांच्या अनुयायांच्या सरंक्षणार्थ होती. ही इस्लाम तर्फे मानवाला त्याच्या श्रध्दा आणि जीवन व्यवस्थे बद्दल दिली जाणारी स्वतंत्रता होती. पैगंबरानी त्या विरोधकांशी युध्द करताना शक्तीच्या सर्व प्राप्त साधनांचा वापर केला. षडयंत्री शत्रूनी कारस्थान करण्यापूर्वी त्यांच्या घरात त्यांची कत्तल केली. *(पृष्ठ ३४)*

अशा गंभीर परस्थितीत कुरआनात उदघृत झालेल्या स्पष्ट आदेशाने खुलासा होतो की उपद्रवाचा सामूहिकरित्या मुकाबला करण्यात आणि उपद्रव माजविणाऱ्या समाजकंटकाशी टक्कर घेण्यात कोणताही समझोता होणे शक्य नाही.

सूरह तौबा आयत १३ मध्ये अल्लाह सांगतात,

"काय तुम्ही लढणार नाही अशा लोकांशी जे आपल्या प्रतिज्ञा भंग करीत राहिले व ज्यांनी पैगंबराला देशातून काढून टाकण्याचा निश्चय केला होता व अतिरेकास प्रारंभ करणारे तेच होते ? तुम्ही त्यांना भिता काय ? जर तुम्ही श्रध्दावंत असाल तर अल्लाह या गोष्टीला जास्त पात्र आहे की तुम्ही त्याची भिती बाळगावी त्यांच्याशी लढा. अल्लाह तुमच्या हाताने त्यांना शिक्षा देईल आणि त्यांना अपमानित करील व त्यांच्या मुकाबल्यास तुम्हाला मदत करील".

सूरह हज्ज च्या आयती ३८ ते ४१ मध्ये कुरआन स्पष्ट करतो

"परवानगी दिली गेली त्या लोकांना ज्यांच्या विरुध्द युध्द सुरू आहे, कारण ते अत्याचार पीडित आहेत. आणि अल्लाह निश्चित पणे त्यांच्या मदतीला समर्थ आहे. हे ते लोक आहेत, जे आपल्या घरांतून नाहक बाहेर काढले गेले, केवळ या अपराधापायी की ते म्हणत होते "आमचा पालनकर्ता अल्लाह आहे." जर अल्लाह लोकांना एक दुसऱ्या करवी हटवीत नसता तर मठ, आणि चर्च व सिने गॉग आणि मस्जिदी ज्यांत अल्लाहचे नाव मोठ्या प्रमाणात घेतले जाते, ते सर्व उदध्वस्त केली गेली असती. अल्लाह जरूर त्या लोकांना सहाय्य करील जे त्याला सहाय्य करतील. अल्लाह मोठा शक्ती शाली आणि जबरदस्त आहे. हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, ज़कात देतील, सत्कर्मांचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील, आणि सर्व बाबींचा अंतिम परिणाम अल्लाहच्या अखत्यारीत आहे."

सूरह बकराच्या आयात १९३ मध्ये कुरआनचा आदेश असा आहे.

"आणि त्यांच्याशी तो पर्यंत युध्द करा जो पर्यंत दंगे होत राहतील, आणि धर्म अल्लाह साठीच होईल नंतर जे परावृत्त झाले तर लक्षात ठेवा, की, अत्याचाऱ्या शिवाय कुणावर ही हात उगारणे उचित नाही"

अल्लाहच्या या स्पष्ट आदेशाने ही गोष्ट प्रकर्षाने समोर येते की जर मुस्लिम समाजाकरिता वा इस्लामी सत्तेकरिता एखादी बाह्य शक्ती धोका निर्माण करीत असेल किंवा हल्ला चढवून आली तर त्यांच्या संरक्षणार्थ जिहाद अनिवार्य होतो. डॉक्टर अब्दुल हमीद अबू सुलैमान यांनी 'जिहाद' चे सविस्तर स्पष्टीकरण आपल्या पुस्तकात करताना इस्लामची सैध्दांतिक भूमिका सप्रमाण मांडली आहे. मक्केतील अनेकेश्वरवादी समाजासोबत राहताना प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायांनी कमालीचा संयम, सहनशिलता व अहिंसेचा सबळ पुरावा दिला येथ पर्यंत की स्थलांतर करून मदीनेत आले. परंतु येथेही जेंव्हा शत्रुने आपल्या कुटील कारस्थानाला व अत्याचाराला बांध घातला नाही तेंव्हा स्वरक्षणार्थ आणि बंडखोरा विरुध्द हत्यार उचलण्याची मुभा ईश्वरादेशाने त्यांना आता मिळाली होती. मक्का येथे मुस्लिम त्याच मिश्र समाजात राहून वैचारिक व बौध्दिक क्रांती आणण्यासाठी प्रयत्नशील होते, ज्या समाजाचे ते एक घटक होते. अहिंसेची ही नीति युक्तीवाद किंवा पॉलिसी म्हणून अवलंबण्यात आली नव्हती तर त्याकाळी मिळालेल्या ईश्वरादेशानुसार धार्मिक आणि सैध्दांतिक भूमिका होती. जिचे पालन करणे मिश्र समाजात वैचारिक क्रांती आणण्याकरिता आवश्यक होते. या काळी मुस्लिम आपल्या पैगंबराच्या नेतृत्वात एकेश्वरवादाच्या अढळ श्रध्देवर कायम होते आणि मक्केतील सत्ताधाऱ्याकडून होणाऱ्या अत्याचाराला संयमाने सहनकरीत आले. धर्मप्रचाराचे कार्य यशस्वीपणे धैर्याने पार पाडीत होते. या काळात मुस्लिमांनी अत्याचार विरुध्द कोणत्याही स्तरावर हिंसा किंवा शक्तीचा वापर न-करता धैर्याचे अप्रतिम उदाहरण कायम केले. समाजाबद्दल हितचिंतन, सहकार्य, सत्कर्म, परोपकार उत्तम चारित्र्याचे प्रदर्शन, गरजवंत व पीडित लोकांची मदत ही सत्कृये ते करीत होते परंतु एकेश्वरावर अढळ श्रध्देच्या बाबतीत त्यांनी कधी तडजोड केली नाही. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कथन आहे.

"अत्याचारी सत्ते समक्ष "सत्यवचन" (हक़) ची ग्वाही देणे सर्वोच्च जिहाद आहे."

प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांचे अनुयायांनी याच शांतीपूर्व नितीवर कायम राहून मदीनेत एका आदर्श समाजाची स्थापना केली आणि सामाजिक नेतृत्वासाठी एक कार्यकारिणी स्थापली.

या वरून हा तर्कसंगत निष्कर्ष निघतो की, समाजाच्या अंतर्गत समस्या मध्ये सबुरी आणि सहनशीलता अनिवार्य आहे. डॉक्टर अब्दुल हमीद पुढे प्रतिपादन करतात की

"ही नीति तो पर्यंत वापरली जाते जोपर्यंत अत्याचारींचा अत्याचार उघड होत नाही आणि जो पर्यंत समाजाचे सामूहिक नेतृत्व अत्याचार संपुष्टात आणण्याकरिता समर्थ होत नाही. समाज परिवर्तनाचा प्रयत्न करणाऱ्यावर होणारे अत्याचार व त्याप्रसंगी त्यांनी दर्शविलेले धैर्य हेच शेवटी परिस्थितीनुरूप सामूहिक नेतृत्वास अत्याचार संपुष्टात आणण्याकरिता बाध्य करील." (अतिरेक आणि राजकीय संघर्ष पृष्ठ - ४४ - डॉ. अब्दुल हमीद)

---

सिनेगॉग :- ज्यू धर्मियांचे प्रार्थनास्थळ

सोप्या शब्दात या विधानाचा हाच अर्थ निघतो की वैयक्तिक स्तरावर शस्त्रास्त्र "जिहाद" ची मुभा नाही.

इस्लाम ने सत्कर्माची आज्ञा देण्याचे आणि कुकर्मा पासून परावृत्त करण्याची सामाजिक बांधिलकी प्रत्येक मुस्लिमांवर टाकली आहे परंतु या बाबतीत जोर-जबरदस्ती बळजबरी करण्याची परवानगी नाही. दुर्दैवाने या सामाजिक बांधिलकीची जाणीव नसल्या मुळे वाजवी पेक्षा जास्त आवेशामुळे काही लोक जोरजबरदस्तीचा मार्ग अवलंबितात. वैयक्तिक स्वार्थ आणि राजनैतिक गटबाजी याचा लाभ घेऊन आगीत तेल ओततात आणि मुस्लिम समाजाचे प्रतिनिधी म्हणून स्वतःच निर्णय घेऊन परस्परविरोधी गट तयार करतात. अशा प्रकारे जालिम आणि भ्रष्ट सत्तेशी संघर्ष करण्यासाठी वैयक्तिक पातळीवर छोटे छोटे विविध गट सज्ज होतात. इस्लाम, जो लोकांची मने जिंकून त्या द्वारे समाज परिवर्तनाने अत्याचारचा बिमोड करण्यासाठी आला आहे, अशा वैयक्तिक चळवळीचा कधीही समर्थक राहिला नाही. डॉक्टर अब्दुल हमीद अबू सुलैमान पुढे लिहतात.

"समाजातून जुलुम अत्याचार संपुष्टात आणण्याकरिता काय करावे हे ठरविण्याचा अधिकार मुस्लिमांच्या प्रातिनिधिक मंडळाचा असून त्यांनी परस्पर विचाररविनिमय करून निश्चित सर्वसम्मत कृती ठरवावी, छोट्या छोट्या गटांनी भावनावेशात काही तरी निर्णय घेऊन एकमेकावर कुरघोडी करण्यासाठी जिहादचे तंत्र वापरू नये.

अतिरेक आणि उपद्रवाच्या काळात भावना विवश झालेले छोटे-छोटे गट आपसात मतभेदाला बळी पडले. तर सुज्ञ लोकांना इस्लाम शांत राहण्याची शिकवण देतो.

प्रेषित मुहम्मद (स.) आपले अनुयायी अबूजर यांना उपदेश करतात "हे अबूजर! त्यावेळी तुझी अवस्था काय होईल जेव्हा लोक असे मृत्युमुखी पडतील की, कोणी कबर खोदणारा नसेल ना कोणी दफनविधी करणारा असेल (कारण सर्व समाज संघर्षात गुरफटलेला असेल) अशा बिकट प्रसंगी तू सबुरीने आणि धैर्याने शांत रहा".

मान. अबुजर (र.) विचारतात - हे पैगंबर ! अशा बिकट प्रसंगी मी माझी तलवार उपसू नये ?

प्रेषित मुहम्मद (स.) उत्तर देतात - तू जर तसे करशील तर तुझा समावेश संघर्ष करणाऱ्या मध्येच होईल.

अबू जर विचारतात - अशा बिकट प्रसंगी मला काय आदेश आहे. प्रेषित मुहम्मद (स.) उपदेश करतात, तू अज्ञातवासात निघून जा आणि तेथे सुध्दा संघर्ष करणाऱ्यासाठी तलवार तुझ्यावर उगारली गेली तर हल्लेखोराच्या पदरात - तुझे आणि त्याचे स्वतःचे दोघांचे पाप टाकले जातील.

ही दीर्घ हदीस ही शिकवण देते की, समाजात उपद्रव पेटला असताना आंधळेपणाने त्यात सामील होण्यापेक्षा अज्ञातवासात निघून जाणे योग्य ठरेल, म्हणजेच अतिरेकाशी आपला संबंध असता कामा नये.

# प्रकरण : ४ थे

## पाश्चिमात्यांची शिरजोरी

आज ज्यू, ख्रिस्ती, नास्तिक आणि सर्व पाश्चिमात्य लोक "इस्लामी दहशतवाद" या विचित्र शब्दप्रयोगाचा सर्रास वापर करीत आहेत. आंतरराष्ट्रीय प्रचार व प्रसार माध्यमाने याचा डांगोरा पिटविण्याचे षडयंत्र रचले आहे. दुर्दैवाने आपल्या देशातील फॅसिस्ट हिंदु आणि देवमालाई संस्कृतीचे पुरस्कर्ते, पाश्चिमात्यांच्या ताटाखालील मांजर झाले आहेत. पाश्चिमात्यांच्या ताटातून पडलेले उष्टे चवीने चघळावे तसे "इस्लामी दहशतवाद" हा शब्दप्रयोग करणे त्यांचा आवडता छंद झाला आहे.

शतकापूर्वी युरोपमध्ये झालेल्या इस्लाम आणि क्रुसेडच्या युद्धमालिकेतील कटु आठवणी आणि मर्मी लागलेले खोल घाव पाश्चिमात्यांच्या उरात पुन्हा ताजे झाले आहेत. त्याच्या प्रतिशोधात जगभर इस्लामला बदनाम करण्याकरिता हा खोटा अपप्रचार त्यांनी चालविला आहे. दहशतवादाचा संबंध इस्लामशी जोडून इस्लामची छवि बिघडविण्यात ते मग्न आहेत.

वास्तविक पाहता युद्धाकरिता युद्ध किंवा छंद म्हणून जिहादच्या नावावर शस्त्र उचलणे याचा इस्लामी इतिहासाशी दूरचाही संबंध नाही. उलट रक्तपात, अत्याचार विध्वंस हे सुदृढ समाजाकरिता भयंकर घातक असल्याचे इस्लामची धारणा आहे, म्हणून ही कुकर्मे कशी संपुष्टात आणता येतील या करिता इस्लाम प्रयत्नशील असतो. पाश्चिमात्य शिरजोऱ्यांनी, कम्युनिस्ट निधर्मियांनी आणि हिंदू फॅसिस्टांनी इस्लाममधील "जिहाद" (प्रयत्नशील असणे) संबंधी चुकीचे विश्लेषण करुन इस्लाम तलवारीच्या जोरावर पसरविला गेल्याची "हाकाटी" केली आणि विरोधकांची कत्तल करणे "जिहाद"मुळे सहज शक्य झाल्याचा अपप्रचार केला.

मानवी इतिहासाच्या अभ्यासाअंती आपण या निष्कर्षावर येतो की, प्रत्येक काळात लोक जुलुम-अत्याचार विरुद्ध संघर्षरत होते. जेव्हा जेव्हा मानवाच्या मूलभूत हक्कावर गदा आली आणि न्यायाचा खून केला गेला, तेव्हा तेव्हा लोक हतबल व मजबूर होऊन जिवाची पर्वा न करता संघर्षात उतरले किंवा भूमिगत होऊन विध्वंसक व अतिरेकी कारवाया करु लागले. नजिकच्या काळात, विविध देशामध्ये गृहयुद्ध, अतिरेक, दहशतवाद, अराजकता, अनाचार, घडत असल्याचे दिसून येते, त्याच्या मुख्य कारणांमध्ये सर्वात प्रबळ कारण हे आहे की, सत्ताधारी पक्षाने मूलभूत हक्काबाबत न्याय न करता लोकावर दांडगाई करुन जुलुम अत्याचार केला.. अल्जेरिया, इजिप्त, टयूनेशिया, लीबिया, चेचनिया येथे लष्करी हुकुमशाहने मानवीय मूल्ये पायदळी तुडवून लष्कराच्या बळावर राज्य चालविले. काही ठिकाणी राजकीय नेत्यांच्या अहमगंडामुळे ही आपत्ती ओढवली तर काही ठिकाणी सत्ता आणि प्रशासन यांनी न्यायदानात कसूर केली

व होणारा अत्याचार शमविला तर नाहीच उलट सरकार अत्याचाऱ्यांचे व अतिरेक्यांचे हातचे बाहुले बनले. शेवटी निराश झालेल्या तरुणांनी शांततामय परिवर्तनाचा मार्ग सोडून सशस्त्र दहशतवादाचा मार्ग चोखाळला.

न्याय न मिळणे हेच दहशतवाद फोफावण्याचे मुख्य कारण आहे. शासन आणि प्रशासन अत्याचारपीडित व गुन्हेगारीने होरपळलेल्या लोकांना न्याय प्रदान करु शकले नाही तर अत्याचारी (जो अत्याचार करतो) विरुद्ध बदल्याची भावना भडकते. दुर्दैवाने आपल्या भारत देशात दंगे-धोपे याची दीर्घ मालिका घडली. या भयानक घटनांमध्ये पोलिस आणि पी.ए.सी. व प्रशासन यांनी अल्पसंख्याकांच्या बाबतीत शत्रुतेची भावना बाळगून रक्तपात आणि विध्वंस करणाऱ्यांविरुद्ध कार्यवाही केली नाही. इतकेच नव्हे तर चौकशी समितीने (Enquiry Commission) ज्या लोकांना दोषी ठरविले त्यांनाही शिक्षा दिली नाही. या उलट सत्ताधारी शासनाने त्यांना पाठिशी घातले. स्वाभाविकरित्या जनतेमध्ये अविश्वासाची भावना बळावली आणि न्याय न मिळाल्यामुळे क्रोधित व क्षुब्ध होऊन त्यांनी शस्त्र उचलले असेल तर त्यास दहशतवाद म्हणता येणार नाही कारण ही तर असहाय्य लोकांची नैसर्गिक प्रतिक्रिया असेल. परंतु तरीही ते इस्लामी "जिहाद" नव्हे.

## दहशतवादीचा कोणताही धर्म नसतो

दहशतवादाचा मुख्य गाभा क्रोध आणि क्षुब्धता आहे. क्रोधित क्षुब्ध आणि त्रस्त होऊन नियोजित पद्धतीने एखाद्या तक्रारीच्या निवारणासाठी, सत्ताशासनाविरुद्ध किंवा एखाद्या राजकीय पक्षाविरुद्ध भयावह वातावरण निर्माण करुन व जनतेची सहानुभूती मिळवून आपल्या मागण्या मान्य करुन घेणे, हा दहशतवादाचा मुख्य उद्देश असतो. शासनाच्या उणीवा उजेडात आणून त्यांचा लाभ घेत जनतेची सहानुभूती मिळविण्याकरिता अशा विक्षिप्त वा विध्वंसक कारवाया दहशतवादी करतात जेणेकरून प्रसारमाध्यमांना त्याची दखल घेणे क्रमप्राप्त ठरते. त्यामुळे दहशतवाद्यांना अमाप प्रसिध्दी मिळते. हा पण दहशतवादाचा दुय्यम उद्देश असतो. दहशतवादी लोक सैद्धांतिक व तत्ववादी असल्याचा बुरखा पांघरतात. सामान्य जनतेच्या ज्या समस्या घेऊन ते उठतात बहुतांशी त्या समस्या वाजवी असतात. कधी कधी एखाद्या विशिष्ट घराण्याबाबत किंवा वंशाबाबत विद्यमान शासनाचा व्यवहार इतका रानटीपणाचा असतो की ते शस्त्र हाती घेण्यास बाध्य होतात. कारणे किती ही वाजवी असली तरी, जगातील कोणताही धर्म आणि विशेष करुन इस्लाम धर्म दहशतवाद अवलंबिण्याची परवानगी कदापि देत नाही वा त्याचे समर्थनही करीत नाही. दहशतवाद निरपराध लोकांना उध्वस्त करुन एका जुलुमाचे प्रत्युत्तर देण्याकरिता त्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक जुलुम-अत्याचार घडवितो. वास्तविकता ही आहे की, पाश्चिमात्य संस्कृती आणि कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाने "बंदूक संस्कृती" ला जन्म दिला आणि जी तरुण पिढी या संस्कृतीत वाढली ती रक्तपिपासू रानटी पशू सारखी वागू लागली.

इस्लाम निरपराध लोकांवर शस्त्र उचलण्यास महापाप समजतो आणि "बंदूक संस्कृती" व त्याद्वारे होणाऱ्या निर्दयी रक्तपाताचा धिक्कार करतो. एवढेच नव्हे तर, शैक्षणिक, सांस्कृतिक व आर्थिक स्तरावर होणाऱ्या सुप्त दहशतवादाचा आणि फॅसीजम (गुंडशाही) चा तीव्र विरोध करतो. आजच्या या प्रगत आणि तथाकथित सुसंस्कृत जगात विविध देशामध्ये वंशवाद, भाषावाद, सांस्कृतिक दुराभिमानाच्या नावाखाली दहशतवादाच्या भयानक घटना घडत आहेत. इस्लामच्या दिर्घकालीन इतिहासात असा कोणताही निंद्य प्रकार आढळून येत नाही. रशिया, अमेरिका, युरोपीय देशात आणि आपल्या भारत देशात सुध्दा लोकशाही आणि मानवतावादाचा उदो उदो करीत भयानक प्रकारचे वांशिक, भाषिक, सांस्कृतिक अत्याचार घडत असल्याचे पाहून मन सुन्न होते. सत्तेचा आश्रय घेऊन दहशतवादी लोक बिनधास्त इतर नागरिकांची भाषा आणि संस्कृती चिरडण्याची आणि देशातून हाकलून देण्याचे जघन्य प्रयत्न करीत आहेत.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात पाश्चिमात्य देशांच्या मनात "नाझीजम" (Nazism) चे भूत थैमान घालीत होते. तदनंतर साम्यवादाचे भयानक तांडव सुरु झाले. आता ही दोन्ही महासत्ता विखुरल्यानंतर धूर्त पाश्चिमात्यांनी "इस्लामी दहशतवादा"चे नवीन अस्त्र जगावर फेकले आहे. इतिहासाच्या भूतकाळातून या अस्त्रास उकरुन काढण्याची मानसिकता यातून निर्माण झाली. इस्लाम आणि क्रूसेडच्या नावावर झालेल्या धर्मयुद्धामध्ये रिचर्ड (तिसरा) चा सलाहुद्दीन अय्यूबी कडून झालेला लज्जास्पद पराभव झाला. या संवेदनशील मानसिकतेचा लाभ घेऊन ज्यू प्रसार माध्यमांनी इस्लाम धर्माची अशी भयानक छवि प्रस्तुत केली आहे. जणु काही संपूर्ण मानवतेसमोर आता इस्लाम आणि मुस्लिम हेच एक मोठे आव्हान (Challenge) उभेठाकले आहे. जॉन एल. स्पायटो यांनी आपले पुस्तक The Islamic Threat (इस्लाम एक आव्हान) मध्ये या शब्दात त्याचे वर्णन केले आहे.

"मुस्लिम येत आहेत, मुस्लिम येत आहेत, या हांकेने पाश्चिमात्यांमध्ये निर्माण झालेल्या भय आणि दहशत याचे प्रतिपादन अमेरिकेचे उपाध्यक्ष डॉन कोयले (Dan Qauyle) यानी "इस्लामी कट्टरवाद आणि त्याचे भयानक परिणाम" या विषयावर बोलताना केले. ही शंकाही त्यांनी उपस्थित केली की, फॅसिझम आणि साम्यवादाशी इस्लाम जुळवून घेतो परंतु लोकशाहीवर त्याचा विश्वास आहे का ?

"इस्लामवर इस्लामची तलवार" या शीर्षकाखाली "बोस्टन ग्लोब" (Boston Globe) या नियतकालिकामध्ये क्रमशः लेखमालिका छापली जाते, तेव्हां प्रश्न पडतो की, वास्तविकता काय आहे आणि काल्पनिक कथानक कोठून सुरु होते ?"

*(The Islamic Threat - Oxford University Press New York 1993 Page - 168*

---

पाकिस्तानचे परवेझ मुशर्रफ या लष्करशाहला अमेरिकेने संपूर्ण पाठिंबा आणि मदत दिली आहे, हे जवळचेच उदाहरण आहे. *(भाषांतरकार)*

काही इस्लामी देशातील तेथील हुकुमशाहाविरुद्ध झालेल्या क्रांत्या, किंवा काही इस्लामी देशात अमेरिकेच्या इच्छेविरुध्द झालेल्या चळवळींचा बहाणा करुन संपूर्ण इस्लामी जगतावर पाश्चिमात्याकडून ज्या बेशर्मीने टीका आणि निषेध केला जातो आहे, ती खरोखरच आजच्या इतिहासाची 'नवलाई' म्हटली पाहिजे; आश्चर्य याचे आहे की अमेरिका आपल्या सी.आय.ए. कडून जगातील बहुतेक देशात राजकीय षडयंत्राची आणि गुन्हेगारीची जी कारस्थाने चालवीत आहे, ती जगजाहीर आहेत. जॉन स्पाजटोच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, "पाश्चिमात्यांना अशी खोड पडली आहे की, आपल्या साम्राज्यवादावर किंवा त्यांच्या उदीम व्यापाराच्या स्वार्थावर काही गदा येत असेल तर निर्लज्जपणे ते आपल्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध खोटे आरोप व आक्षेपांचा भडिमार सुरु करतात. कधी ही ओरड इस्लामच्या नावाने असते तर कधी साम्यवादाच्या नांवाने असते."

खाडीच्या युद्धाबाबत विश्लेषण करताना स्पाजटोने हे सत्य कथन केले आहे की :-

खाडी युद्धात अमेरिका नवीन जागतिक व्यवस्थेचा प्रणेता म्हणून जगासमोर येऊ इच्छित होता. संपूर्ण आशिया, आफ्रीका आणि युरोप खंडात मानवीय हक्क, स्वतंत्रता आणि लोकशाही नांदावी याची अमेरिकेला खूप चिंता होती परंतु मुस्लिम देशामध्ये तेथील जनतेने आपल्या मर्जीने निधर्मी बेलगाम लोकशाही ऐवजी इस्लामी पद्धतीची मर्यादित लोकशाही व्यवस्था कायम करण्याचा प्रयत्न केल्यास लोकशाहीचा पुरस्कर्त्या अमेरिकेची तळपायाची आग मस्तकाला जाते. याचे मूर्तीमंत उदाहरण द्यावयाचे झाल्यास टयूनिस, अल्जेरिया, इजिप्त येथे अमेरिकेने आपल्या संपूर्ण पाठिंब्याने व मदतीने निर्दयी हुकुमशहांना सत्तेवर बसविले, जे तेथील जनतेच्या जिवाशी रक्ताची होळी खेळत होते. हे सत्य जगजाहीर आहे.

पाश्चिमात्य देश विसाव्या शतकाखेर दीर्घकालापासून मुस्लिम देश आणि मुस्लिम समाजास पाहत आले आहेत. जेथे मुस्लिम समाज उच्च तांत्रिक, वैद्यकीय, औद्योगिक प्रगती करणारा शांततामय समाज आहे. तेथे तरी पण पाश्चिमात्य देशातील प्रसारमाध्यमांना फक्त रक्तपातच का दिसतो; याचे जॉन एल स्पायटोला आश्चर्य वाटते :-

"इस्लाम आणि मुस्लिमांचे चित्र मागील १४ शतकापासून आक्रमक योद्धे आणि प्रक्षोभक कृत्य करणारे हल्लेखोर म्हणून रंगविले जात आहे. या हल्ल्याकरिता "जिहाद" कारणीभूत असल्याचे भासविले जात आहे. उलट पाश्चिमात्यांना आत्मसंरक्षण करणारे आणि प्रक्षोभ सहन करणारे, धर्मयुद्ध लढणारे, आपली हडप केलेली भूमि परत मिळविण्यासाठी धडपडणारे म्हणून प्रस्तुत करण्यात येत आहे."

*(Islamic Threat Page 178 - by John Sposlito)*

बर्नार्ड ल्यूस आपल्या पुस्तकात पाश्चिमात्यांची धारणा विशद करतो की "कट्टरवाद हा आधुनिकता, (Secularism) धर्मनिरपेक्षता आणि पाश्चिमात्य भांडवलशाही व

---

अल्जेरिया मध्ये सॅलव्हेश इस्लामिक फ्रंट निवडणुकीत बहुमताने निवडून आला होता परंतु अमेरिकेने मध्ये लुडबुड करुन लष्करी राजवट आणली. (भाषांतरकार)

लोकशाहीच्या विरुद्ध संघर्षरत आहे. आधुनिकता व पुरोगामित्वामुळे सतत बदलत राहणाऱ्या जीवनमूल्यांपेक्षा भूतकाळातील त्याची (कट्टरवादाची) जीवनव्यवस्थाच तो कायम ठेवू इच्छितो."

पाश्चिमात्य लेखक याला दोन संस्कृतीची लढाई संबोधितात. यात एक जुनाच शत्रू आहे जो ख्रिस्ती सांस्कृतिक ठेव व जीवनपद्धतीशी त्याच्या जागतिक स्तरावरील प्रसाराशी लढा देत आहे.

विसाव्या शतकात जागतिक पटलावर होणारा दहशतवाद आणि अत्याचार; याचा आढावा घेऊन जॉन स्पायटो लिहितो की —

"बहुतेक करुन दहशतवादाचा संघर्ष व रक्तपात निधर्मीकारणांमुळे घडला आहे; ज्यात आक्रमक जातीयवाद, वंशवाद, राष्ट्रवाद, सांस्कृतिक दुराभिमान आणि भौतिक स्वार्थ सामील आहेत. मागील शतकात आंतरराष्ट्रीय स्तरावर कार्यरत असलेल्या दहशतवादी संघटनांची सूचि पाहिल्यास पॅलेस्टाईन आणि कश्मीर व अशा प्रश्नावर संघर्ष करणाऱ्या मुस्लिम संघटना अगदीच नगण्य आहेत.

भारत देशात देखील साम्यवादी व हिंदू फॅसिस्ट दहशतवादी संघटनांची यादी लांबलचक आहे तर त्यामानाने त्या तोडीची एकही मुस्लिम संघटना नाही.

पाश्चिमात्यांनी इस्लाम व मुस्लिमांचा संबंध दहशतवादाशी जोडून आधुनिक राष्ट्रांच्या अभिनव मानवतावादी गटात त्यांना सामील करुन न घेण्याचे कारण पाश्चिमात्य हे सांगतात की, लोकशाही वर त्यांचा दृढ विश्वास नाही. विनोदाचा भागच म्हणावा लागेल की, मुस्लिम देशामध्ये लोकशाही मार्गाने पारदर्शक निवडणुका घेऊन व मताधिक्याने निवडून येऊन जनतेच्या मर्जीनुसार लोकशाही प्रक्रियेचा भाग म्हणून इस्लामी जीवनव्यवस्था लागू करु इच्छितात तर ही गोष्ट पाश्चिमात्यांना मान्य नाही. कारण ईश्वराला कानून बनविणारा (Law giver) मानणे पाश्चिमात्यांच्या दृष्टीने फारच मोठा गुन्हा आहे. नामांकित पाश्चिमात्य पत्रकार लेज्ली गिल्ब (Leslie Gelb) लिहतो :- "आज इस्लामी देशात लोकशाही पद्धतीच्या निवडणुका जरी घेतल्या तरी धार्मिक कट्टरवादी बहुमताने निवडून येतील. अशा प्रकारे मग तेथे धर्मराज्य (Theocracy) लागू करण्याचा मार्ग मोकळा होईल. विविध अरब देशात कट्टरवादी गटाने लोकशाही मार्गाच्या निवडणुकींचा आग्रह धरला आहे. त्यांना खात्री आहे की पीडित लोकांना न्याय देण्याकरिता ते निश्चित निवडून येऊ शकतील. परंतु तेथे वास्तविक लोकशाही (Democracy निधर्मीलोकशाही) ते जोपासू शकतील का याबद्दल शंका वाटते. इस्लाम राजकारण आणि धर्म या दोघामध्ये विभाजन रेषाच मारीत नाही. सौदी अरब हा लोकशाही प्रणित देश नाही परंतु संपूर्ण इस्लामी व्यवस्था स्वीकारतो. तेथे राजकीय गतिविधी वाढवून लोकशाही जरी आणली नाही तरी इस्लामने त्यांना दिलेल्या स्वातंत्र्यावरच कदाचित गदा येईल. त्यामुळे कोणीही न्यायप्रिय व्यक्ती वा संस्था तथाकथित लोकशाही स्वीकारुन इस्लामद्वारे आपल्यास मिळणाऱ्या हक्कावर पाणी सोडण्यास तयार होणार नाही. अशा परिस्थितीत तेथे निवडणुका घेणे हास्यास्पद ठरेल."

*(The Free Elections Trap - New York Times May 29, 1991)*

वरील विधानावरुन लोकशाहीचा जो अर्थ आणि त्याबाबतीत पाश्चिमात्यांची धारणा व लोकशाहीबद्दल त्यांना असलेला आदर याचे पितळ उघडे पडते. म्हणूनच अमेरिका आपल्या स्वार्थासाठी बहुतेक अरब देशात लोकशाहीपेक्षा हुकुमशाही व डिक्टेटरशिपला प्राधान्य देत आहे. पाश्चिमात्य संस्कृती आणि तथाकथित नागरी जीवनमूल्ये याची अमेरिकेला इतकी काळजी आहे की एखाद्या देशातील संपूर्ण जनतेच्या सहमतीला पायदळी तुडवून आपल्या समर्थक हुकुमशहा मार्फत आणि वेळ पडल्यास लष्कराचे साह्य घेऊन अमेरिका आपला सांस्कृतिक अजेंडा लागू करणे ह्यास लोकशाहीची फार मोठी सेवा समजतो. आणि याविरुद्ध जर कोणी आवाज उठवील तर त्याला फॅसिस्ट, कट्टरवादी, दहशतवादी संबोधून संपूर्ण मानवजातीला धोका असल्याची ओरड अमेरिका करतो.

मध्यपूर्व आशियामध्ये लोकशाहीची लक्तरे वेशीला टांगून इस्लामी कट्टर वादाच्या धोक्याची आरोळी देऊन "सुरक्षित लोकशाही" (Risk Free Democracy) चा जो प्रयोग अमेरिकेने चालविला आहे; तो ख्रिस्ती आणि ज्यू साम्राज्यवादी मनोवृत्तीचे द्योतक आहे. वास्तविक पाहता, समस्त मानवजातीला पहिल्यांदा इस्लामनेच जोरजबरदस्ती, दहशत व दडपशाही वातावरणातून मुक्त केले, जेव्हां संपूर्ण जग बे-लगाम शासकांच्या रानटी व पाशवी अत्याचाराच्या जोखडात अडकलेला होता. आणि भविष्यातसुद्धा खरी लोकशाही, मतस्वातंत्र्य, मानवीय हक्क, माणुसकीची महिमा यांचे संरक्षण इस्लामच करु शकेल. कारण, इस्लामी शिकवणीचा गाभा समानता, मतस्वातंत्र्य, परस्पर विचारविनिमय, मानवतेचा सन्मान हा आहे.

इस्लामी जगतात इस्लामच्या पुनरुत्थानासाठी प्रयत्नशील असणाऱ्या इस्लामी संघटनांमध्ये लोकशाही व परस्पर विचार विनिमय या दोन मूलभूत बाबी प्रकर्षाने दिसून येतात. लोकशाहीच्या नावावर पसरविण्यात येत असलेली पाश्चिमात्य संस्कृती, अश्लीलता, भौतिकवाद, दडपशाही याला त्या संघटना कधीही भीक घालत नाही आणि भविष्यात पण भीक घालणार नाहीत. मतस्वातंत्र्य व व्यक्ति स्वातंत्र्याचा उदो उदो करणाऱ्या पाश्चिमात्य देशात एक स्त्री जेव्हां आपल्या डोक्यावरील स्कार्फ काढण्यास तयार होत नाही तेव्हा विषयवासनेने बरबटलेले व्यक्तीस्वातंत्र्याचे समर्थक हे लांडगे तिचा पोशाख छिन्नविच्छिन्न करण्यास सरसावतात !

इस्लामी मूल्ये व लोकशाही मूल्यांना परस्परविरोधी ठरविणारे वास्तविकतः मनुष्याच्या पाशवी अधिकारासाठी सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहेत.

इस्लाम आणि इस्लामी समाजव्यवस्था व इस्लामी शासनपद्धती यावर पाश्चिमात्यांचा असा आरोप आहे की मुस्लिमेतर अल्पसंख्यकांना त्या व्यवस्थेत आवाज उठविण्याचा हक्क नाही. तसेच त्यांच्याकरिता कायदे करण्यामध्ये त्यांचा सहभाग नाही.

वास्तविक इस्लामी व्यवस्थेत अल्पसंख्यक (जिम्मी) चे हक्क शरीअतनुसार आधीच निर्धारित करण्यात आले आहेत. म्हणून चर्चा करुन ते बदलता येणे शक्य नाही. हा एक खोडसाळ आरोप आहे; जो त्या पाश्चिमात्यांकडून लावला जात आहे. त्यांनी वंशवाद, वर्णभेद, भाषा, श्रद्धा या गोष्टींवर त्यांच्या समाजाचे विभाजन केले आणि अल्पसंख्यकांना शतकानुशतके द्वेषपूर्ण व उपहासात्मक वागणूक देत आले आहेत. तेथे या भेदनीतिमुळे राष्ट्राध्यक्ष तर दूर, प्रशासनातील प्रमुख पदावर घेण्याच्या अधिकारापासून ते वंचित आहेत. या उलट इस्लामी देशात असा भेदभाव कदापि केला जात नाही. जर त्यांनी इस्लामी जीवन व्यवस्थेवर ईमान आणले तर त्यांना राष्ट्राध्यक्षाचे पदग्रहण करण्यात कोणीही आडकाठी घालू शकत नाही.

पाश्चिमात्यांनी १७व्या शतकानंतर धर्म आणि राजनीति यांची फारकत केली आणि परस्पर क्षेत्रात हस्तक्षेप करण्यावर कडक बंदी घातली. धर्माच्या बाबतीत त्यांनी सोयीस्कर गैरसमज दृढ केला की, वैयक्तिक आचरण, परंपरा आणि काही विशिष्ट उपासना पद्धतीचेच नांव धर्म आहे. जीवनातील इतर बाबींचा धर्माशी काही एक संबंध नाही. जॉन स्पाजटोच्या शब्दात :-

"धर्म एक श्रद्धा व्यवस्था आहे, जी व्यक्तीच्या वैयक्तिक बाबीपर्यंतच मर्यादित आहे. राजनीती आणि चर्च (धर्म) यांची फारकत आंतरराष्ट्रीय स्तरावर इतकी लोकप्रिय झाली व आपला इतिहास लोक विसरुन गेले. बहुतेकांची धारणा अशी झाली की, हा त्रिकालाबाधित वैश्विक नियम आहे जो बदलता येणे शक्य नाही. म्हणूनच आधुनिक सेक्युलराजिमच्या पार्श्वभूमीत धर्माला राजनीतीत प्रवेश देणे हा भयानक प्रकारचा अतिरेक समजला जाऊ लागला. अशा पूर्वग्रहदूषित राजनैतिक समीक्षकांचा संबंध जेव्हा मुस्लिमांशी येतो, जे इस्लामला एक परिपूर्ण व संतुलित जीवनव्यवस्था मानतात, तेव्हा त्यांना इस्लामी कट्टरवादी म्हटले जाते. या कट्टरवाद्यांना प्रतिगामी आणि कुठलाच बदल न स्वीकारणारे माथेफिरु ठरविले जाते. त्यांच्या विरुद्ध अपप्रचार केला जातो की संपूर्ण मानवतेला त्यांच्यापासून भयंकर धोका आहे. बहुतेक इस्लामी देशाच्या हुकुमशाहीची मनोवृत्ती पण अशीच आहे. मूठभर भावनाविवश तरुणांच्या गटांनी केलेल्या दहशतवादी कारवाया पुरावा म्हणून प्रकर्षाने सादर केल्या जातात की, धर्म आणि राजनीती एकत्र आल्याने कसे भयंकर परिणाम समोर येतात." *(Islamic Threat - Page 199 - By Sposlito)*

पाश्चिमात्यांची हीच धारणा की धर्माचा व्यक्तीच्या सामाजिक व राजनैतिक जीवनाशी सुतराम संबंध नाही, खरा इस्लाम समजून घेण्यात अडथळा बनली आहे. हीच धारणा पाश्चिमात्यांच्या सर्व संस्था, व्यवहार, आणि शिक्षणव्यवस्थेवर प्रभावित झाली

आहे. स्या विचारसरणीपासून एक इंचसुध्दा हलण्याचा ते विचार करु शकत नाहीत. याच चुकीच्या धारणेपोटी पाश्चिमात्यांनी ख्रिस्ती धर्मास इतके पायदळी तुडविले की, पुनश्च त्याचे पुनरुत्थान करुन आपल्या जीवनात सम्मानजनक स्थान देण्याचा ते विचार सुध्दा करु शकत नाहीत. इतिहास साक्ष आहे की पूर्वी असा प्रयत्न कोणी केला असल्यास त्याला मूलतत्ववादी, कट्टरवादी (Fundamentalist) या उपाधी बहाल करण्यात आल्या आहेत. आजच्या काळात असा प्रयत्न झाल्यास इस्लाम धर्मियांनासुध्दा "इस्लामी दहशतवादी" वा "इस्लामी अतिरेकी" अशा उपाधी देण्यात येत आहेत.

दररोज बदलणाऱ्या भौतिक जीवनात पाश्चिमात्य संस्कृतीत भौतिक जीवनाची आसक्तीच सर्वस्व आहे. भौतिक जीवनाच्या बदलत्या प्रवाहात धर्म आणि चारित्र्याशी असलेला संबंध पूर्णतः लयाला गेला आहे; तथाकथित प्रगतीशील समाजाची आज ही ओळख बनली आहे. कोणतीही शक्ती या कालचक्रास परत उलटे फिरवू शकणार नाही. जान स्पाजटोच्या शब्दात :-

"सतराव्या शतकानंतरच्या काळात वैज्ञानिक शोधामुळे युरोपने भौतिक जीवनाचे अत्युच्च शिखर गाठले. पाश्चिमात्यांनी ही धारणा पक्की केली की धर्म हा वैयक्तिक श्रध्देचा भाग आहे, जीवनव्यवस्थेशी त्याचा सुतराम संबंध नाही. पाश्चिमात्यांच्या या विकृत मनोवृत्तीने इस्लामची स्वाभाविकता समजून घेण्याची त्यांची पात्रताच संपुष्टात आणली. कृत्रिमरुपाने पाश्चिमात्यांनी धर्माला बंदिस्त करुन अत्याचार, पुरोगामीत्व व जडत्वाला धर्माचे आवश्यक घटक ठरविले. परिणामी धर्माची प्रगतीशीलता त्यांना उमजू शकली नाही. जो धर्म राजनीतीशी आपले नाते जोडतो तो पाश्चिमात्यांच्या दृष्टीने अधोगतीकडे नेणारा वेडेपणा (Fanatacism) आणि रानटीपणा ठरतो आणि हाच जगाकरिता मोठा धोका ठरला आहे."

*(Islamic Threat Page 102 - By John Sposlito)*

पाश्चिमात्यांची अशी सर्वसम्मत धारणा झाली असली तरी त्यांच्या विचारवंत व ज्ञानी लोकात असा मतप्रवाह जन्माला आला आहे की, साऱ्या इस्लामी संघटना आणि मुस्लिम गटांना कट्टरवादी व संकुचित समजण्याची मोठी चूक त्यांच्याकडून घडली आहे. त्या विचारवंताना प्रकर्षाने ही गोष्ट जाणवली आहे की, विसाव्या शतकात बहुतेक मुस्लिम तत्वज्ञानी आणि समाजसुधारकांनी केलेल्या प्रयत्नामुळे परस्पर विचारविनिमयाचे महत्व, सर्वसम्मती; न्यायसंगत निर्णयक्षमताचे महत्व खूप वाढीस लागले आहे. बदलत्या परिस्थितीचे चिंतन व मनन, इस्लामी शरीअतशी सुसंगत स्पष्टीकरण आणि प्रत्यक्षात त्याची अंमलबजावणी याचा परीघ विस्तारत आहे.

पाश्चिमात्य संस्कृतीतील लोकशाही नीतीमूल्ये आणि मानवी हक्काकरिता त्यांची पराकाष्ठा हे इस्लामी शिकवणीशी बहुतांशी जुळतात याची सुखद जाणीव इस्लामी संघटनांना झाल्यानंतर या बाबतीत पाश्चिमात्यांना सहकार्य करण्याची सत्प्रवृत्ती ईस्लामी देशामध्ये आणि मुस्लिम संघटनांमध्ये वाढीस लागली आहे; ज्यामुळे ज्यू प्रसारमाध्यम व पश्चिमी फॅसिस्टानी इस्लाम व मुस्लिमांना कलंकित करुन प्रस्तुत करण्याचे आणि दहशतवादाचा संबंध इस्लामशी जोडण्याचे पाश्चिमात्यांचे प्रयत्न खुद्द पश्चिमी देशात तिरस्करणीय ठरले आहेत.

इस्लामी जगतात काही गट असे आहेत की, त्यांनी राजकीय बदल्याच्या भावनेने प्रेरित होऊन, सशस्त्र संघर्षाद्वारेच इस्लामी व्यवस्था लागू करता येऊ शकते अशा बढाया मारल्या. या गटांनी मार्किसस्ट आणि माओत्सेतुंग सारखे बंदुकीच्या गोळीद्वारे क्रांती घडविण्याच्या गोष्टी केल्या परंतु सामान्य जनतेचे आणि इस्लामी संघटनांचे समर्थन त्यांना मिळू शकले नाही. हे गट अत्यल्प असून इस्लामी जगतातील जनतेच्या तुलनेत त्यांचा प्रभाव नगण्य आहे. अल जिहाद, हिज्बुल्लाह, सिपाहे खुदा, इस्लामिक लिबरेशन ऑर्गनायझेशन, दोजख से नजात, अशा नावांनी कारवाया करणाऱ्या या छोटया गटांना इस्लामी संघटनांचे आणि मुस्लिम उम्मतचे समर्थन कधीच प्राप्त झालेले नाही. तसेच हे लहान-सहान गट मुस्लिम उम्मतचे खरे प्रतिनिधी सुद्धा नाहीत. या गटांनी दहशतवादाचा अवलंब केला आहे तो पण त्यांच्या समकालीन पश्चिमी जहाल गटांनी व साम्यवादी चळवळींनी अनुसरलेला मार्ग म्हणून त्यांचाच कित्ता गिरवीत आहेत. अमेरिका आणि त्याची मित्र राष्ट्रे या दहशतवादी गटांना आपापल्या वैयक्तिक स्वार्थासाठी पाठबळ देत आली आहेत. कारण आपआपसात लढविणे व क्षेत्रीय अशांती सतत धगधगती ठेवणे हा अमेरिकी परराष्ट्र नीतीचा एक भाग आणि आवडता छंद आहे. म्हणूनच जेव्हां इस्लामी राष्ट्रामध्ये सर्व संमतीने व प्रामाणिकपणे इस्लामी नैतिक मूल्यांना प्रस्थापित व प्रबळ करण्याकरिता पाऊल उचलले जाते, तेव्हां अमेरिकाच सर्वप्रथम त्याचा कट्टर विरोध करतो जणू सर्व जगावर "पोलिसमन" ची भूमिका त्याला साकार करावयाची आहे. आणि हे करावयाचे कशाकरिता तर क्षीण होत चाललेल्या पाश्चिमात्य संस्कृतीच्या बचावा करिता ?

सारांश, "इस्लामी दहशतवाद" हे एक काल्पनिक भूत आहे, ज्याचा अमेरिकेने बाऊ केला आहे. पाश्चिमात्यांचा व ज्यू प्रसार माध्यमांचा हा अपप्रचार आता जागतिक स्तरावर अस्त पावत आहे; व प्रभावहीन ठरत आहे.

---

तळटीप : म्हणूनच आत्महत्या हे पाप आणि सामाजिक गुन्हा आहे.

## प्रकरण पाचवे
## जिहाद आणि दहशतवाद

जिहाद आणि दहशतवाद वास्तविक पाहता दोन भिन्न विरुद्ध टोके आहेत. या दोहोत जमीन आस्मानाचा फरक आहे. जिहाद मानव प्राणाचा सन्मान, शांती व सुरक्षिततेची हमी, अत्याचाराचा बीमोड, सत्याचे समर्थन व संरक्षणकरिता केला जातो. या उलट द्वेष, प्रतिशोध, दंगा, उपद्रव, अनाचार आणि निरपराध व बेकसूर लोकांची कत्तल करण्याच्या वेडेपणाचे नांव आहे दहशतवाद. परंतु पूर्व व पश्चिमचे बहुतेक विचारवंत पूर्वग्रहदूषित असून बेजबाबदारपणे, कुत्सित प्रवृत्तीने, जिहाद आणि दहशतवाद समानार्थी असल्याचे सांगून इस्लाम आणि मुस्लिम यांना बदनाम करीत आहेत. प्रकरण १ आणि २ मध्ये दहशतवादाची व्याख्या आणि त्याचा सविस्तर इतिहास आपल्या समक्ष आणला गेला आहे. प्रस्तुत प्रकरणी इस्लामी पुस्तकांच्या आधारे "जिहाद" चे विश्लेषण त्याच्या मर्यादा आणि शर्ती यांचा सनदशीर आढावा घेण्यात येईल.

इस्लाम समस्त मानवजातीच्या संरक्षणाची आणि मानवप्राणाच्या नितांत आदराची जागतिक स्तरावर जबाबदारी घेतो आणि हे महान कार्य करण्याचे 'जिहाद' हे द्योतक आहे. प्रसिद्ध इस्लामी तत्वज्ञानी मौलाना मौदूदी (रह) आपल्या पुस्तकात लिहतात — "मानवी नागरी समाजाचा पाया ज्या संविधानावर कायम आहे, त्यातील पहिले महत्वाचे कलम म्हणजे, मानवी प्राण आणि मानवी रक्ताचा नितांत आदर करणे. नागरी समाजाचा प्रथम क्रमांकाचा मूलभूत हक्क प्रत्येक मानवास जीवंत राहण्याचा हक्क देणे आहे. आणि नागरी सांस्कृतिक कर्तव्य म्हणून मानवाने जिवंत राहिले पाहिजे. जगात जितके म्हणून विधिनियम आहे त्या प्रत्येकामध्ये मानवप्राणाचा नितांत आदर करण्याचा नैतिक नियम आवर्जून नोंदविला गेला आहे. ज्या धर्मामध्ये आणि त्याच्या कायदा-कानून (विधिनियम) मध्ये हा प्राथमिक हक्क दिला गेला नसेल, तो सुसंस्कृत मानवी समाजाचा कायदा-कानून होऊच शकत नाही आणि या मूलभूत कायद्याच्या अनुपस्थितीत कोणताही समाज शांततामय जीवन जगूच शकणार नाही.'

*(अलजिहाद-फिल-इस्लाम पृष्ठ - २२ - मौलाना मौदूदी (रह)*

ज्या इस्लामने उपरनिर्दिष्ट मानवीय हक्काला असामान्य प्राधान्य दिले आहे, त्या इस्लामबद्दल पाश्चिमात्य देश इस्लाम हा रक्तपिपासू धर्म असून आपल्या अनुयायांना तो रक्तपाताची शिकवण देतो असे दोषारोप लावतात हे विडंबनच म्हणावे लागेल.

मौलाना मौदूदी (रह) "अलजिहाद-फिल इस्लाम" या पुस्तकाच्या पृष्ठ १९-१५ वर प्रतिपादन करतात :-

---

**तळटीप :** मानवांच्या उपदेशाकरिता प्रेषित येशू ख्रिस्ताने पर्वतावर दिलेले प्रवचन प्रसिद्ध आहे; ज्यामध्ये मानवांना नैतिक मूल्ये आणि सामाजिक जबाबदारी ची शिकवण दिली गेली होती.

"हा दोषारोपण इस्लामवर या वेळी करण्यात आला जेव्हा, जगातील इस्लामी महासत्तेचा सूर्य अस्ताला गेला होता. या काल्पनिक दोषारोपणाच्या पुतळ्यामध्ये प्राण त्यावेळी ओतण्यात आले, जेव्हा इस्लामची तलवार गंजून गेली होती. दोषारोपण करणाऱ्या युरोपची तलवार मात्र निरापराधींच्या रक्ताने माखलेली होती. युरोप त्याकाळी जगातील दुर्बल देशांना असे गिळंकृत करीत होता, जसे अजगर लहान-सहान जनावरांना गिळंकृत करतो."

वास्तविकता ही आहे की, इस्लाम मानवजातीवर होत असलेला अत्याचार संपुष्टात आणण्याकरिता शस्त्र उचलण्याचे आदेश देतो. कारण निरपराध मानवीय जीवाची सुरक्षा, हा इस्लामी संस्कृतीचा आत्मा आहे.

कुरआनमध्ये सूरहमाइदा आयत ३२ मध्ये उद्धृत करण्यात आले आहे :-

"ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीवर उपद्रव पसरविण्याव्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणु काही सर्व मानवांना ठार केले आणि ज्याने कोणाला जीवदान दिले (अत्याचारातून सोडविले) जणु काही त्याने सर्व मानवजातीला जीवन प्रदान केले."

सूरह अनआम आयत १५१ मध्ये अल्लाह सांगतात :-

"तुमच्यावर अनिवार्य आहे की, अल्लाह सोबत कुणालाही भागीदार बनवू नका आणि आईवडिलांशी सद्वर्तन करा, आणि आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार मारु नका, आम्ही तुम्हाला देखील उपजीविका देतो आणि त्यांना ही (संततीलाही) देतो. अश्लील गोष्टीच्या जवळपास देखील फिरकू नका मग त्या उघड असोत अथवा गुपित. आणि कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले (म्हणजेच मानवजीवाला) ठार करु नका परंतु न्याय संगत (असेल तर)."

इस्लामच्या या शिकवणीचाच प्रभाव होता आणि या शिकवणीमुळे निर्माण झालेल्या समाजाची पुण्याई होती की, अल्पमुदतीत अरबांसारखी भांडखोर व रक्तपिपासू क़ौम (जाति) सभ्यता व सुसंस्कृतपणाच्या मुशीत ओतली गेली आणि मानवजातीच्या आदराने प्रेरित होऊन शांतता व सुरक्षिततेची प्रतीक बनून जगाच्या कानाकोपऱ्यात पसरली. याचे वर्णन मौलाना मौदूदी (रह) यांनी अशा प्रकारे केले आहे :-

"मानवाच्या चुकींच्या अनेक प्रथा आणि मार्गभ्रष्टतेचे जसे इस्लामी शिकवणीने उच्चाटन केले, तसे मानवी जीवांचा त्याकाळी जो अनादर केला जात होता त्यास यशस्वी लगाम घातला. इस्लामने आवाज बुलंद केला की, मानवी जीवाची हत्या निषिद्ध आहे; मानवी जीवाला ठार करु नका परंतु न्यायसंगत असेल तर. या बुलंद आवाजात एक शक्ती होती आणि हा आवाज "अहिंसा परमोधर्म" सारखा बुद्धी आणि मानवी स्वभावाच्या विपरीत कदापि नव्हता; म्हणूनच हा आवाज जेथे जेथे पोहोचला तेथे तेथे मानवी जीव सुरक्षित झाला. समाज शास्त्राचा न्यायप्रिय तत्वज्ञानी याचा कदापि इन्कार करु शकत नाही की, मानवी जीवाच्या मूल्याचे महत्व पटविण्याचा जो अभिमान इस्लामला आहे तो "अहिंसापरमो धर्म" च्या हाकेला नाही किंवा येशूख्रिस्ताच्या पर्वतावरील प्रवचनाला ही नाही" *(अलजिहाद फिल इस्लाम पृष्ट १२९ - मौलाना मौदूदी)*

इस्लाम, जसे मानवी जीवा (प्राण) चा आदर करणारा आणि त्याच्या सुरक्षिततेचा भक्कम समर्थक आहे, तसे गुन्हेगाराला त्याच्या गुन्ह्याची शिक्षा देण्यात सुद्धा कसूर करीत नाही. इस्लाम गुन्हेगाराला त्याच्या वाईट कृत्यांची शिक्षा देणे न्यायप्रिय समाजाची सामाजिक व न्यायिक जबाबदारी ठरवितो. समाजातील कोणत्याही व्यक्तिस अशी 'सूट' देता कामा नये की: व्यक्ती समाजात दुराचार व अत्याचार पसरवेल, आणि त्याचा अत्याचारी हात धरणारा कोणी नसेल. म्हणूनच इस्लामने असे कायदे (फौजदारी व दीवानी) केले आहेत की, व्यक्ती आपल्या वैयक्तिक मर्यादेत स्वतंत्र आहे, परंतु ही मर्यादा ओलांडून जर कोणी समाजात भौतिक आणि अध्यात्मिक शांतता भंग करीत असेल तर त्याला जबर शिक्षा दिली गेली पाहिजे. इस्लामने सामाजिक उपद्रवाला खून करण्यापेक्षा भयंकर असा अपराध ठरविला आहे. प्रेषित मुहम्मद (स) यांचे कथन आहे :—

"अत्याचारी आणि ज्याच्यावर अत्याचार केला गेला आहे, दोघांना मदत करा".

या अद्‌भुत कथनाच्या विश्लेषणार्थ प्रेषित मुहम्मद (स.) सांगतात - अत्याचारीला जुलुम करण्यापासून परावृत्त करणे, जुलुम करताना त्याचा हात धरणे (म्हणजेच त्यास अटक करुन शिक्षा करणे) ही अत्याचाऱ्याची मदत आहे.

मौलाना मौदूदी (रह) आपले प्रसिद्ध पुस्तक "अलजिहाद-फिल-इस्लाम" मध्ये लिहितात - "अत्याचारीला जी शिक्षा केली जाते, ती त्यावर सक्ती नसून दया आहे. कारण शिक्षा देऊन अत्याचारीला जुलुम करण्यापासून परावृत्त करणे, म्हणजेच त्याने पुन्हा कोणावरही जुलुम करु नये; जेणेकरुन मरणोत्तर जीवनात (परोक्षात) तो नरकाच्या यातनापासून सुरक्षित रहावा. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले :- "या शिक्षा अल्लाहच्या मर्यादा आहेत. एक मर्यादा कायम करणे म्हणजे चार दिवस झालेल्या पर्जन्यापेक्षा जास्त लाभदायक आहे. जगाचा हा अद्‌भुत धर्म आहे, जो मानवी जीवनाच्या सन्मानाकरिता जेवढे कठोर आदेश देतो, त्यापेक्षा कठोर शिक्षा अत्याचाऱ्याला करण्याची तो दक्षता घेतो."

एक गोष्ट मानवी जीवापेक्षाही महत्वाची आहे, ती म्हणजे मानवाला दिलेला हक्क. हक्क प्रस्थापित करण्याकरिता रक्त जरी वाहीले गेले तरी ते वाहणे अनिवार्य ठरते आणि न वाहणे मोठा गुन्हा ठरतो. मानव जोपर्यंत एकमेकांच्या हक्काचा आदर करतो तोपर्यंत मानवी जीवाचा सन्मान आदरणीय असतो परंतु जेव्हा एखाद्याचा हक्क मारला जातो किंवा हक्क मारण्यासाठी त्यावर जांच-जुलुम केला जातो तेव्हां तो अत्याचारी आपल्या रक्ताचा आदर गमावून बसतो आणि अत्याचाऱ्याच्या रक्ताची किंमत पाण्यापेक्षाही कमी होते. *(अल जिहाद फिल इस्लाम पृष्ठ ३२ - मौलाना मौदुदी (रह)*

इस्लाममध्ये 'जिहाद'ची परवानगी फक्त सामाजिक उपद्रव शमविण्याकरिताच देण्यात आली आहे आणि सामाजिक शांतता व सुरक्षितता कायम टिकविण्याचे ते

---

भगवद्‌गीतेमध्ये श्रीकृष्णाने अर्जुनाला याच कर्तव्याची जाणीव करुन दिली आहे. *(भाषांतरकार)*

एकमेव साधन आहे. विशेषकरुन व्यक्ती ऐवजी संघटना पूर्वग्रह दूषित होऊन किंवा आपल्या क्षुल्लक स्वार्थाने आंधळी होऊन सामूहिक अत्याचाराचा अवलंब करतात तेव्हां पूर्ण समाज किंवा पूर्ण देशच उपद्रवाचे लक्ष्य होऊ शकतो. म्हणून अत्याचार व उपद्रव शमविणे अत्यावश्यक ठरते. एका तत्वज्ञानीचे कथन आहे :-

"संघटनांकडून किंवा बंडखोराकडून होणारा सामूहिक अत्याचार आणि उपद्रव अमर्यादित असतो, ज्यामध्ये शेकडो, हजारो मानवांचे जीवन असहाय्य होते आणि पूर्ण समाजाला पंगुत्व येते, संस्कृतीच्या संपूर्ण व्यवस्थेत अस्वस्थता निर्माण होते. या परिस्थितीचे निराकरण कठोर पाऊले उचलून अत्याचाऱ्यांना देहदंडित केल्याशिवाय कदापि शक्य नाही."

मानवीय इतिहासात असे कठिण प्रसंग येतात, जेव्हां 'युद्ध अनिवार्य' ठरते. अत्याचार, उपद्रव, कुप्रवृत्ती संपुष्टात आणण्याकरिता सत्यवचनी व सत्प्रवृत्त लोकांनी रणांगणात उतरणे त्यांचे कर्तव्य ठरते. कुरआन मध्ये सूरहहज आयत ४० मध्ये अल्लाह फर्मावितो :-

"जर अल्लाह लोकांना एक दुसऱ्याकरवी हटवीत नसता तर मठ, चर्च सिनेगॉग (ज्यु लोकांचे प्रार्थनास्थळ) आणि मस्जिदी ज्यांत अल्लाहचे नाव मोठया प्रमाणात घेतले जाते, सर्व उध्वस्त केली गेली असती."

सूरेह माईदा आयत ६४ मध्ये अल्लाह फर्मावितो :-

"जेव्हां कधी हे युद्धाचा अग्नी भडकावितात, अल्लाह त्या अग्नीला विझवून टाकतो. हे पृथ्वीवर हिंसाचार पसरविण्याचा प्रयत्न करीत आहेत पण अल्लाह हिंसाचार माजविणाऱ्यांना मुळीच पसंत करीत नाही."

नियतीचा हा निर्णयच आहे की, दंगे, अशांतता, असूया, द्वेषमूलकता, संकुचितपणा, दुराभिमान या कुप्रवृत्तींचा नायनाट करण्याकरिता सत्प्रवृत्त व सदाचारी लोकांनी 'जिहाद फी सबील्लिलाह' (ईश्वराच्या आदेशाप्रमाणे प्रयत्नांची पराकाष्ठा) करण्याकरिता रणांगणात उतरलेच पाहिजे. हे धर्मयुद्ध फक्त ईश्वरासाठीच लढले जाते आणि हे भौतिक कारणासाठी किंवा आपला भूप्रदेश वाढविण्याकरिता लढल्या जाणाऱ्या युद्धाहून अगदीच भिन्न आहे. हे धर्मयुद्ध त्याच लोकाविरुद्ध लढले जाते जे ईश्वरीय व्यवस्थेविरुद्ध बंड करतात आणि समाजावर जुलुम व अत्याचार करतात या धर्मयुद्धाचे महत्व कुरआनने फारच प्रभावीपणे मांडले आहे :-

"हे श्रद्धाधारकांनो ! मी दाखवू तुम्हाला तो व्यापार जो तुम्हाला यातनादायक प्रकोपापासून वाचवील ? श्रद्धा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर आणि प्रयत्नांची पराकाष्ठा (जिहाद) करा अल्लाहच्या मार्गात आपल्या वित्तानिशी आणि आपल्या प्राणांनिशी हेच तुमच्यासाठी उत्तम आहे, जर तुम्ही समजून घेतले. *(सूरह अस्सफ आयत १०)*

जिहादचा महत्वाचा पैलू असा आहे की, हे धर्मयुद्ध फक्त ईश्वराची मर्जी संपादन करण्याकरिता केले जाते. गीतेमध्ये चर्चिल्याप्रमाणे राज्य हस्तगत करण्याकरिता किंवा ऐहिक सुखे उपभोगण्यासाठी नव्हे. कुरआनामध्ये जेथे जेथे

जिहादच्या आयाती आल्या आहेत ते हेच दर्शवितात की मरणोत्तर जीवनात (परोक्षात) स्वर्गात अत्युच्च दर्जा मिळावा आणि नरकाग्नी पासून तो सुरक्षित रहावा; म्हणूनच इस्लाममध्ये ईमान (श्रद्धा) नंतर जिहादचा दर्जा सर्वोच्च आहे.

मौलाना मौदूदी (रह) आपल्या पुस्तकात लिहितात :-

"मानवात ही प्रेरणा निर्माण व्हावी की, कुप्रवृत्तीला त्याने कोणत्याही परिस्थितीत सहन करु नये आणि वाईट वृत्तींचा नायनाट करण्याकरिता तो सर्वस्व त्याग करण्यास सदैव तयार असावा. ही प्रेरणाच मानवी सत्प्रवृत्तींची अत्युच्च प्रेरणा आहे. जो व्यक्ति इतरांची कुप्रवृत्ती सहन करीत असतो त्याची ही नैतिक दुर्बलता आणि भ्याड मनोवृत्ती त्यालाही कुप्रवृत्तीस प्रोत्साहीत करते. याच्या परिणामात त्याच्यावर लाचारी आणि पराधीनता लादली जाते आणि तो अल्लाहच्या कोपाने वेढला जातो.

सारांश, जिहादचा उद्देश लाचारी आणि पराधीनतेचे जीवन जगण्याऐवजी प्रतिष्ठा आणि इभ्रतीचे जीवन जगण्याच्या संसाधनासाठी प्रयत्नशील राहणे आहे. जो समाज भय आणि भित्र्याचे जीवन जगण्यात समाधान मानतो कुरआन त्याची निंदा करतो (सूरहनिसा आयत ९७) मध्ये अल्लाह सांगतात –

"ज्या लोकांच्या आत्म्यांना देवदूत या स्थितीत काबीज करतील की ते आयुष्यभर स्वतावर अत्याचार करीत जगले त्यांना देवदुताने विचारले की, तुम्ही (लाचारीच्या) या कोणत्या स्थितीत जगत होता ? त्यांनी उत्तर दिले की आम्ही पृथ्वीवर निर्बल होतो. देवदुतांने सांगितले काय अल्लाहची पृथ्वी विशाल नव्हती की तुम्ही स्थलांतर करून दुसरीकडे जावे ? अशा लोकांची जागा नरक आहे जी वाईट जागा आहे."

अर्थात जो समाज लाचारी आणि दुर्बलतेचे जीवन जगण्यात समाधानी आहे, त्याला स्वतः आपल्यावरच अत्याचार करणारा म्हटले आहे; दुर्बलतेचा बहाणा करणाऱ्यांना प्रश्न विचारला गेला आहे की अशा भूमीला ठोकर मारुन तुम्ही स्थलांतर का केले नाही ? मन मारुन शरीराची सुरक्षितता आणि ऐहिक सुखाला मान-प्रतिष्ठा पेक्षा जास्त महत्व देणाऱ्यांना कठोर शिक्षा होईल आणि त्यांचा ठिकाणा नरक असेल.

जिहादचा विस्ताराने अर्थ सांगताना मौलाना मौदूदी (रह) लिहितात :- "जो कोणी तुमचे मुलभूत मानवी हक्क हिरावून घेण्याचा प्रयत्न करील, तुमच्यावर जुलुम अत्याचार करील, तुमच्या वैध मालकीच्या संपत्तीपासून तुम्हास बेदखल करील, तुमच्या सद्सद्विवेक आणि ईमानचे स्वातंत्र्य संपुष्टात आणील, आणि तुमच्या शरअी (धार्मिक) जीवनव्यवस्थेवर चालण्यास आडकाठी आणील आणि तुमची संघटनात्मक रचना उध्वस्त करील, फक्त या करिताच की तुम्ही मुस्लिम आहात तर त्यांच्याशी मुकाबला करताना तुम्ही कदापि दुर्बलता दाखवू नका आणि आपल्या सर्व शक्तीनिशी त्या अत्याचाराचा बिमोड करा. *(अल् जिहाद फिल इस्लाम पृष्ठ ५६)*

मुस्लिमांची धार्मिक आणि सांस्कृतिक ओळख कायम राखण्याकरिता आणि समाजात माजविल्या जाणाऱ्या उपद्रवाला संपविण्याकरिता अल्लाहने जिहादला अनिवार्य ठरविले आहे. परंतु जिहाद पुकारण्याबाबत फार मोठी जबाबदारी आणि कडक शर्ती इस्लामी शासनावर लादल्या आहेत, कारण लहान-सहान घरगुती वा सामाजिक संघर्षाला जिहादचे नांव देता कामा नये कुरआनमध्ये सूरे बकरा मध्ये अल्लाह फर्मावितो :-

"अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी युद्ध करा जे तुमच्याशी युद्ध करतात आणि मर्यादेपुढे जाऊ नका कारण अल्लाह अतिरेक करणाऱ्यांना पसंत करीत नाही."

सत्यमार्गाच्या संरक्षणाकरिता जिहाद अनिवार्य ठरविला गेला आहे. अर्थात, मानवाचे मूलभूत हक्क पायदळी तुडवून त्याच्या स्वाभाविक स्वातंत्र्याला संपुष्टात आणणाऱ्या विरुद्ध जिहाद आवश्यक ठरतो. सत्यमार्गापर्यंत पोहचणाऱ्यांच्या मार्गात अडथळे निर्माण करणाऱ्यांचा बंदोबस्त करणे हा पण जिहाद आहे. मौलाना मौदूदी (रह) त्यांच्या प्रसिद्ध पुस्तक 'अलजिहाद फिल इस्लाम' मध्ये लिहितात.

"एखाद्याच्या मार्गात अडथळा निर्माण करण्याचे तीन प्रकार असू शकतात.

१) जे लोक त्या (ईश) मार्गावर येऊ इच्छितात त्यांना त्या मार्गावर येण्यात अडथळा निर्माण करणे.

२) जे लोक त्या (ईश) मार्गावर चालत आहेत त्यांना त्या मार्गावरुन जोर-जबरदस्ती करुन हटविणे.

३) त्या मार्गावर चालत असलेल्या लोकांच्या मार्गात काटे पसरविणे (यातना देणे), त्यांना भयभीत करण्याचा प्रयत्न करणे त्यांना इतके त्रस्त करुन सोडणे की त्या मार्गावर चालणे त्यांना कठिणतम व्हावे.

जो कोणी व्यक्ती वा संघटना सत्यमार्गावर चालणाऱ्याशी असा दूर्व्यवहार करील त्याचा जोर तोडणे हा मुस्लिमांचा नैतिक हक्क आणि धार्मिक कर्तव्य ठरतो."

*(अलजिहाद-फिल-इस्लाम पृष्ठ ६६ - मौलाना मौदूदी (रह.)*

जेव्हां काही लोक प्रस्थापित सामाजिक शांततेचा भंग करतात किंवा अत्याचार, उपद्रव माजवून न्यायसंगत इस्लामी शासनाविरुद्ध बंड पुकारतात व शासनाचे आसन उलथविण्याचे कट-कारस्थान करतात, दरोडे करतात, रक्तपाताचा बाजार मांडतात त्यांच्याविरुद्ध जिहाद करणे अनिवार्य ठरते.

कुरआन मजीदच्या सूरे-माईदा आयत ३३ मध्ये अल्लाह फर्मावितो :-

"जे लोक अल्लाह आणि त्याचे पैगंबर यांच्याशी युद्ध करतात आणि भूमीवर याकरिता धावपळ करतात की हिंसाचार माजवावा, त्यांची शिक्षा ही आहे की ते ठार मारले जातील अथवा सुळावर चढविले जातील अथवा परस्पराविरुद्ध दिशेने त्यांचे हात-पाय कापले जातील अथवा त्यांना देशांतर करावयास लावले जाईल."

जिहाद अशा परिस्थितीत सुद्धा लागू होतो, जेव्हां की श्रद्धाधारकांचा (मुस्लिमांचा) एक समूह आपल्या लाचारी आणि दुर्बलतेमुळे शत्रूच्या कचाटयात अडकलेला आहे आणि त्या मुस्लिम समूहात इतकी शक्ती नाही की तो स्वतःची सुटका करुन घेऊ शकेल, तेव्हां इस्लामी शासनाचे हे कर्तव्य ठरते की आपल्या अत्याचार-पीडित बांधवांना त्या अत्याचारातून मुक्त करण्यासाठी अत्याचाऱ्याविरुद्ध युद्ध पुकारावे. कुरआन मजीदच्यामध्ये अल्लाह फर्मावितो :-

"तुम्हाला काय झाले आहे की, अल्लाहच्या मार्गात तुम्ही त्या दुर्बल पुरुषाकरिता आणि मुलांकरिता युद्ध करत नाही, जे म्हणतात की हे पालनकर्त्या आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ जेथील लोक मोठे अत्याचारी आहेत आणि आमच्याकरिता तुझ्याकडून कोणाला तरी आमचा मददगार व समर्थक बनव."

इस्लामी जीवन व्यवस्थेत सद्वर्तनाचे आवाहन करण्यासोबत दुराचाराला प्रतिबंध करण्याला अनन्यसाधारण महत्व आहे. कुरआनच्या आयती आणि प्रेषित मुहम्मदां (स) च्या वचनामध्ये विस्ताराने याचा उपदेश करण्यात आला आहे. दुराचाराला प्रतिबंध करण्याबाबत कठोर शिक्षा आणि सक्तीने त्याची अंमलबजावणी करण्याचा प्रसंग येतो परंतु जसे मागे उद्धृत करण्यात आले आहे, वैयक्तिक स्तरावर असे करण्याची परवानगी देण्यात आलेली नाही, तर परस्पर विचारविनिमयाने किंवा इस्लामी सत्ताप्रमुखाने अंमलबजावणीचा हा निर्णय जबाबदारीने घ्यावा; अशी अट आहे. मात्र दुराचाराची चीड, आणि वाईट प्रवृत्तीच्या लोकांपासून अलिप्तता ही प्रत्येक इस्लामी समाजातील प्रत्येक व्यक्तीची वैयक्तीक जबाबदारी राहील.

प्रेषित मुहम्मद (स) यांनी आपल्या हदीसमध्ये बनीईसराईलचे वैगुण्य सांगताना विशद केले आहे की :-

"बनी इस्त्राईल" प्रेषित मूसा (अ.) यांचे अनुयायी यातूनच नंतर 'ज्यू' जाती बनलीमध्ये पहिले वैगुण्य जे निर्माण झाले, ते म्हणजे दुराचाराबद्दल त्यांची चीड शिथील झाली आणि दुराचाराला सहन करण्याचे खोटे सांमजस्य त्यांच्यात निर्माण झाले; ज्यामुळे हळूहळू ते दुराचारात लिप्त झाले. बनी ईसराईल मधील एक व्यक्ती दुसऱ्यास भेटल्यावर उपदेश करीत असे की, "ईशभय बाळगा आणि ही दुराचारी कृती सोडून दे"

परंतु दुसऱ्या दिवशी त्या दुराचारी व्यक्तीची भेट झाल्यास त्याच्याशी मिळून-मिसळून वागण्यास त्याला काही संकोच वाटत नसे. शेवटी त्या दुराचाराचा कुप्रभाव त्यावर पडला आणि त्याच्यातील सद्सद्विवेक मृत झाला.

दुराचार जेव्हां उपद्रव माजविण्यापर्यंत मजल गाठतो तेव्हां दुराचाराविरुद्ध जिहाद करणे इस्लामी समाजावर अनिवार्य होते. उपद्रव माजविण्याचे स्पष्टीकरण इस्लामी विचारवंतानी विस्ताराने केले आहे. समाजाच्या दुर्बल घटकांवर जुलुम करणे, त्यांचे वैध हक्क संपुष्टात आणणे, जोर-जबरदस्ती करुन सत्यमार्गावर चालणाऱ्यांना त्रस्त करुन सोडणे, वाईट प्रवृत्तींचा प्रसार करणे, वाईट कृत्ये करण्याकरिता सामूहिक प्रयत्न करणे; दंगे-धोपे पेटविणे, वंश, भाषा हे दुराभिमान निर्माण करुन समाजात फूट पाडून सत्ता हस्तगत करण्याचा प्रयत्न करणे, लोकांना न्यायापासून वंचित करणे, अश्लीलता आणि व्यभिचाराला प्रोत्साहन देणे, सामाजिक संबंधात गैरसमज निर्माण करुन ते बिघडविणे ही सर्व दुराचाराची गंभीर कृत्ये आहेत. अशी कृत्ये करणाऱ्या लोकांविरुद्ध जिहाद पुकारणे इस्लामी शासकाची अनिवार्य जबाबदारी आहे.

पाश्चिमात्यांनी एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात साम्राज्यवादाच्या नशेत धुंद होऊन कित्येक देशाना उद्‌ध्वस्त केले. भारत देशाचा ब्रिटीशकालीन इतिहासात अशा अत्याचाराची व धूर्त कट-कारस्थानांच्या स्पष्ट नोंदी आहेत. "फूट पाडा - आणि राज्य करा" ही धूर्त नीती वापरुन ब्रिटीशांनी भारतीय समाजात हिंदू-मुस्लिम द्वेषाची बीजे रुजविली आणि आपले साम्राज्य वाढविले. आशिया खंडातील विविध देशांचे वित्तीय व सांस्कृतिक शोषण ब्रिटीश साम्राज्यशाहीने ज्याप्रकारे केले, तसे शोषण चंगेज खाँ आणि हलाकू खाँ या रानटी आक्रमकांनी सुध्दा केले नसेल.

आज अमेरिका, जगातील एकमेव महासत्ता, लोकशाही, आणि मानवीय हक्काच्या संरक्षणाची दवंडी पिटीत त्याच इतिहासाची पुनरावृत्ती करु इच्छित आहे. हा इतिहास घडविण्यासाठी अमेरिकेला काही बळीचे बकरे पाहिजे आहेत; त्याचा हा उद्देश सफल करण्याकरिता इस्लामी देश आणि मुस्लिम सर्वात सोपे लक्ष्य त्यास दिसत आहेत. परंतु अमेरिकेला हे पण माहित आहे की, जुलुम अत्याचारांविरुद्ध लढण्याची इस्लामची क्षमता पारंपारिक आहे. म्हणून मध्य आशियातील कांही मुस्लिम देश अमेरिकेला चीनपेक्षा भयानक वाटतात. इस्लाम आणि मुस्लिमांना जागतिक पातळीवर बदनाम करण्याकरिता जिहाद, दहशतवाद आणि इस्लाम यांचा परस्पर संबंध जोडण्याचे षडयंत्र पाश्चिमात्यांनी हेतुपरस्पर सुरु केले आहे.

खरे पाहता, या दोषारोपांचा वास्तविकेशी तिळमात्र संबंध नाही.

# प्रकरण सहावे

## सत्प्रवृत्त सामाजिक क्रांतीचा पुरस्कर्ता – इस्लाम

जगांत घडलेल्या विविध क्रांतीच्या इतिहासावर दृष्टिक्षेप टाकल्यास प्रकर्षाने ही गोष्ट जाणवते की सर्व क्रांत्या रक्तरंजित होत्या. बेसुमार (अगणित) मानवाच्या शवांना तुडवीत क्रांतीच्या प्रणेत्यांना वाट काढावी लागली. अत्याचार, आर्त किंकाळ्या, मृत्युचे तांडव यातून मार्गाक्रमण करीत क्रांतीचा विजय-जल्लोष सांजरा केला गेला. परंतु जगाच्या पाठीवर एक "अद्‌भुत क्रांती" अशीही घडली, ज्याने मानवांचे चारित्र्य, संस्कृती आणि संपूर्ण इतिहासाचा कायापालट केला.

अनेक ईश्वरासमोर लोटांगण घालणारे, मालकांसाठी गुलामासारखे राबविले जाणारे मानव आता एका ईश्वरासमोर नतमस्तक झाले आणि त्यांची संपूर्ण जीवन व्यवस्थाच पार बदलून गेली. लक्षावधी मानव स्वेच्छेने या काफ़िल्यात सामील झाले; त्यांच्यावर कुठली जोर-जबरदस्ती करण्यात आली नाही की अतिरेक, अत्याचार करण्यात आला नाही. आदर्श जीवनाचा असा सर्वोत्तम नमूना मानवांना आकर्षित करीत होता, जेथे सर्व मानव समान होते आणि सृष्टीची अतिआदरणीय कृति म्हणून श्रेष्ठतम दर्जा मानवांना मिळाला. शांतता आणि सुरक्षितता त्या आदर्श समाजाचा प्राण होता. ही अद्‌भुत क्रांती घडताना काही रक्तपात आणि युद्धे झाली परंतु "समग्र क्रांती" पाहिली असता फारच थोड्या प्रमाणात मनुष्य हानि झाल्याचे इतिहास साक्ष देतो आहे. यादृष्टीने खरोखरच ही एक अद्‌भुत क्रांतीच म्हणावी लागेल.

इस्लामने क्रांती वा बदल घडविण्याकरिता अतिरेक, जोर-जबरदस्ती किंवा रक्तपात याची कदापि परवानगी दिली नाही. विचार परिवर्तन करुन माणसांची मने बदलली गेली पाहिजेत हा 'मंत्र' इस्लामने दिला ज्यांची मने सहज बदलू शकली नाहीत त्यांना सतत उपदेश देऊन उपदेश केला संयम राखण्याची शिकवण इस्लमाने दिली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांचा मक्केतील १३ वर्षाचा संघर्षकाल याचीच प्रचीती देतो. एकेश्वराचा संदेश देत असताना प्रेषित आणि त्यांच्या अनुयायांवर अनन्वित अत्याचार, जुलुम केला जात असे. मोठ्या धैर्याने आणि संयमाने या यातना तेरा वर्षे ते सहन करीत राहिले. परंतु प्रत्युत्तर म्हणून कधीच अत्याचार व दहशतवादाचा मार्ग अवलंबिला नाही. कारण त्याची परवानगीच ईश्वराकडून नव्हती. मक्कावासियांकडून होणारा छळ सहनशीलतेच्या मर्यादा तोडून गेला तेव्हां स्थलांतराची परवानगी देण्यात आली. परंतु स्थलांतर करतांना-ही मुस्लिमांने प्रत्युत्तर म्हणून कसलीच कारवाई केली नाही; जेव्हां की त्यांना अत्याचार, घेरावबंदी, सामाजिक बहिष्कार, कत्तल यासारख्या भयंकर यातना मक्कावासियांनी दिल्या होत्या.

मक्केमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) अत्यंत धैर्याने आणि संयमाने लोकांना एकेश्वरवादाचे आवाहन करीत होते. सद्‌वर्तनांचा उपदेश करीत होते आणि वाईट चाली रिती व प्रवृत्तीपासून परावृत्त करीत होते. त्यांच्या निरंतर प्रयत्नामुळे शेवटी बौद्धिक व वैचारिक क्रांतीची मजल इथपर्यंत पोचली की, मक्केतील बहुतेक लोक उघडपणे प्रेषितांच्या समर्थनासाठी जरी पुढे आले नाहीत तरी प्रेषित मुहम्मद (स) यांच्या सत्यवचनांचा आणि मोठेपणाचा स्वीकार मनापासून केला. प्रेषित मुहम्मद (स) आणि त्यांच्या अनुयायाबद्दल त्यांच्या मनात सहानुभूती निर्माण झाली आणि कुरैशच्या मोठमोठ्या सरदारांचे विरोधाचे प्रयत्न निष्फळ ठरले. मक्केतील विरोधकांनी शेवटी प्रेषित मुहम्मद (स) यांना ठार मारण्याचे षडयंत्र रचले परंतु ईशकृपेने ते यशस्वीपणे मदिनेला स्थलांतर करण्यात यशस्वी झाले. प्रेषित मुहम्मद (स) यांचे हे यश फार मोठे होते. या कठिण काळी कुरआनच्या बहुतेक आयतीमध्ये प्रेषित मुहम्मद (स) यांना संयम व धैर्य राखण्याचा सतत उपदेश केला गेला.

सूरे मुज्जम्मिल आयती ८ ते ११ मध्ये अल्लाह फ़र्मावितो :-

"आपल्या पालनकर्त्याच्या नामाचे स्मरण करीत जा आणि सर्वापासून तुटून त्याचे (ईश्वराचेच) बनून रहा. तो पूर्व-पश्चिमचा स्वामी आहे, त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही म्हणून त्यालाच आपला मुखत्यार बनवा. आणि ज्या गोष्टी लोक बनवीत आहेत त्यावर धैर्य राखा आणि सभ्यतेने त्यांच्यापासून वेगळे व्हा. या खोटे ठरणाऱ्या सुखवस्तू लोकांशी निपटण्याचे कार्य तुम्ही माझ्यावर सोडा, आणि त्यांना काही थोडा वेळ याच अवस्थेत राहू द्या.

सूरे ग़ाफिर आयात ५५ मध्ये अल्लाह फर्मावितो :-

''म्हणून, हे पैगंबर, (स.) संयम राखा, अल्लाहचे वचन सत्याधिष्ठित आहे, आपल्या चुकीबद्दल क्षमा-याचना करा आणि सकाळ-संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याच्या स्तुती बरोबरच त्याचे पावित्र्यगान करीत राहा."

सूरे लुक़मान आयत १७ मध्ये अल्लाह फ़र्मावितो :-

"बेटा, नमाज क़ायम कर. सत्कृत्यांचा आदेश दे, दुष्कृत्यांची सफ़ाई कर आणि जी काही आपत्ती येईल त्यावर संयम राख; आणि हे मोठ्या धैर्याचे काम आहे."

सारांश, प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या मक्की (मक्का शहरात वास्तव्याचा काळ) जीवनात आपल्या अनुयायांमध्ये अप्रतिम नैतिकतेची बीजे रुजविली आणि एकेश्वरवादाचा महिमा मनावर बिंबवून या नैतिकतेची अशी शक्ती निर्माण केली की, त्यामुळे जीवनातील अतिकठिण प्रसंगी सुद्धा प्रत्येक यातना त्यांनी संयम आणि मोठ्या धैर्याने सहन करीत यशाकडे वाटचाल सुरु ठेवली.

हे सत्य आहे की जगाचे नेतृत्व अल्लाहने नेहमीच त्या लोकांना बहाल केले, जे भौतिक आणि नैतिक दोन्ही दृष्टया सक्षम होते, परंतु वास्तविक पाहता भौतिक साधनापेक्षा नैतिकताच जास्त प्रबळ आणि निर्णायक शक्ती ठरते. मौलाना मौदूदी (रह) आपले पुस्तक "तहरीके इस्लामी ची नैतिक मूल्ये" पृष्ठ १५ मध्ये उद्‌धृत करतात :-

"व्यक्तीची वैशिष्टये जे तिला नेतृत्व प्रदान करतात, ती म्हणजे नैतिक जबाबदारीची जाणीव आणि नैतिक अधिकार हेच आहेत. म्हणजेच समाजामध्ये बनाव किंवा बिघाड घडविण्याची निर्णायक शक्ती नैतिकताच आहे. समाजाची उन्नती वा अधोगती त्या समाजातील नैतिक कायदेकानून वरच निर्भर असते."

मानवाच्या वैयक्तिक परिघापासून जागतिक परिघापर्यंत इस्लाम नैतिकतेलाच केंद्रबिंदु बनवितो. मूलभूत नैतिक मूल्येच मानवाच्या उद्देशपूर्ती करिता अनिवार्य आहेत, मग तो उद्देश खुद्द योग्य असो वा अयोग्य. जी व्यक्ति आणि समाज समूह या मूलभूत नैतिक मूल्यांने संस्कारित असेल निश्चितच यश संपादन करु शकेल. प्रबळ इच्छा-शक्ती, निर्णयक्षमता, हिम्मत आणि धैर्य, संयम व स्थितप्रज्ञता, सहनशीलता, कर्तव्यदक्षता, जबाबदारीची जाणीव, दूरदर्शिता, वासना आणि भावनावर नियंत्रण ही सर्व आवश्यक मूलभूत नैतिक मूल्ये आहेत ज्याशिवाय फक्त भौतिक संसाधनाच्या बळावर कोणतीही मोहीम सर करणे अशक्यप्राय आहे.

मौलाना मौदूदी (रह) आपले पुस्तक "तहरीके इस्लामी की अखलाकी (नैतिक) बुनयादे" पृष्ठ ३१ वर लिहतात :-

"व्यक्तिची प्रतिष्ठा आणि पत ज्या नैतिक मूल्यांवर आधारित असते, ती फार मोठी निर्णायक शक्ती ठरते. ही नैतिक मूल्ये म्हणजे स्वाभिमान, मनाचा मोठेपणा, करुणा, सहानुभूति, न्याय, दूरदृष्टि, सभ्यता, अमानत, सदाचारवृत्ती, वचनपूर्ती आणि संतुलित विचारसरणी. या गुणवैशिष्ठांमुळे व्यक्ति कोणतेही उद्दिष्ट साध्य करु शकते; परंतु इस्लामी क्रांती घडविण्यासाठी या गुणवैशिष्ठ्यांशिवाय आणखी काही गुणांची अत्यंत आवश्यकता असते, त्या गुणांचा केंद्रबिंदु एकेश्वरवाद असतो. एक ईश्वरावर श्रद्धाच व्यक्तिला व्यक्तिपूजा, घराणेशाही, सांप्रदायिकता, देशभक्ती यापेक्षा उच्चतम ध्येय म्हणजेच सत्यप्रियता, समता व न्याय याकरिता कार्यरत करते; ज्यामुळे व्यक्तिचे कार्यक्षेत्र विस्तृत होऊन "वसुधैव कुटुंबकम" च्या उच्चतम ध्येयाकडे ही वाटचाल सुरु होते. समस्त मानवांच्या कल्याणाचा तो विचार करु लागतो. नैतिक मूल्ये आणि एकेश्वरवादाच्या मिलापामुळे एक व्यक्ति अथांग सागर बनते. उदाहरणार्थ 'संयम' हाच गुण व्यक्तिच्या संपूर्ण जीवनाचा कायापालट करतो; फक्त छळ, यातना सहन करणारा लाचार व्यक्ति तो राहत नाही तर, विषयवासना, इच्छा आकांक्षा, भावना व संवेदना, या सर्व बाबतीत तो संयमशील बनतो. मग कुठलाही स्वार्थ व मोह त्याला या सत्यमार्गापासून भ्रष्ट करु शकत नाही.

म्हणूनच इस्लामी क्रांतीसाठी प्रयत्नशील असणाऱ्या व्यक्तिसमोर कितीही मोठ्या अडचणी, समस्या, नुकसान आले तरी तो पथभ्रष्ट होत नाही. त्याच्या प्रयत्नांना यश येवो किंवा अपयश तो नेहमीच आपल्या ध्येय-धोरणावर कायम राहतो. निराश होऊन कोणताही दुर्विचार वा दुराचार तो अवलंबित नाही तर धैर्य आणि संयम राखून आपल्या मरणोत्तर जीवनाच्या साफल्याकरिता तो सतत प्रयत्नशील राहतो. असा अमर्याद 'संयम' बाळगल्याशिवाय इस्लामी क्रांतीच्या कठिण मार्गावर एक पाऊल सुद्धा चालणे अशक्य आहे." *(मौलाना मौदूदी (र))*

सारांश, इस्लामी क्रांतीचा दहशतवादाशी दूरान्वये सुद्धा काही संबंध नाही. इस्लामी क्रांती भौतिक संसाधनांच्या सोबत नैतिक मूल्यांची अप्रतिम जोड असली तरच यशस्वी होऊ शकते. मानवांचे मन परिवर्तन हाच इस्लामी क्रांतीचा "मूलमंत्र" आहे.

मौलाना मौदूदी (रह) आपले पुस्तक "तहरीके इस्लामी की अखलाकी बुनयादें" (इस्लामी चळवळीची नैतिक मूल्ये) पृष्ठ ३१ वर लिहतात :-

"माणसांची मने फक्त काही आकर्षक तत्वांनी परिवर्तित होत नाहीत तर वास्तविक हितचिंतन, शुद्ध नियत, सदाचारी वृत्ती, निःस्वार्थपणा, मनाचा मोठेपणा, सहानुभूती, न्याय आणि मानमर्यादा या गुणविशेषांनी प्रभावित होऊन परिवर्तित होतात. हे गुणविशेष युद्ध, तह, जय-पराजय, मित्रता व शत्रुता या कठिण प्रसंगी कसोटीला लागतात. हे चारित्र्य मूलभूत नैतिक मूल्यांचे अत्युच्च शिखर आहे."

नुसत्या भौतिक संसाधनावर आणि नाममात्र नैतिकतेच्या बळावर ज्या चळवळी विजय प्राप्त करतात त्या सांप्रदायिकता, वंशवाद, प्रांतीयवाद भाषावाद आणि मर्यादित भौतिक लाभाच्या परिघाबाहेर निघू शकत नाहीत. आणि लवकरच व्यक्तीपूजा, जातीय दुराभिमानाचे बळी ठरतात. मानव सन्मान, सामाजिक समता, समान मानवी हक्क यांचा डांगोरा जरी ते पिटीत असले तरी गरज पडल्यास अनैतिक मार्ग वापरुन आपली संकीर्णता दर्शवितात आणि आपले मर्यादित ध्येय साध्य करुन घेण्यासाठी सत्यता, वचनपूर्ती, न्याय, अमानत, पार झुगारुन देऊन धूर्तपणाने वाईट मार्ग सुद्धा अवलंबितात.

सध्या जगाच्या पाठीवर दोन प्रकारचे देश अस्तित्वात आहेत. एक प्रकार, जेथे बे लगाम हुकुमशहाचे राज्य चालते, परंतु ते हुकुमशाह आपली सत्ता टिकविण्यासाठी सामान्य जनतेच्या लाभाचे व मर्यादित नैतिकतेची समाजकार्ये व विकास कार्ये करीत असतात. दुसरा प्रकार लोकशाही तंत्राचा आहे. जेथे जनता मतस्वातंत्र्याचा वापर करुन आपल्या मर्जीने शासन बदलू शकते. शासन बदलण्याकरिता शांततापूर्ण मार्गाने आपले विचार मांडण्याचा त्याचा प्रचार व प्रसार करण्याचा जनतेला अधिकारपण प्राप्त आहे. परंतु दोन्ही प्रकारच्या देशामध्ये अत्याचार, हिंसाचार, दहशतवाद इत्यादी गैरमार्ग वापरुन सत्ता बदलण्याचे प्रयोग सतत चालू असतात हे सत्य आपणास मान्य करावे लागेल. या गैरमार्गाने कदाचित प्रासंगिक यश ही त्या चळवळींना मिळते परंतु ठोस, विधायक परिवर्तन या गैरमार्गाने आणता येऊ शकते याची हमी देणे शक्य नाही. असे गैरमार्ग लोकतांत्रिक प्रणालीमध्ये वापरणे निश्चित संकुचितपणा आहे व दूरदर्शीपणा नसल्याचे द्योतक आहे, ज्यापासून लाभापेक्षा नुकसान व विध्वंसच जास्त होतो. आपल्या भारत देशाचेच पहा. नक्षलवादी आणि माओ समर्थक कम्युनिस्ट चळवळी दीर्घ मुदतीपासून संघर्षरत आहेत परंतु त्यांना यश मिळाले नाही.

इस्लाम आणि त्यावर आधारित आदर्श, संतुलित व परिपूर्ण जीवनव्यवस्थे विषयी लोकांना समजाविण्याकरिता संपूर्ण निष्ठेने व स्वयंप्रेरणेने मुस्लिमांनी प्रयत्न केल्यास होणारे परिणाम फॅसिस्ट आणि मानवांना भेदभावाच्या खाईत लोटणाऱ्या संघटनांपेक्षा किती

तरी पटीने प्रभावी होतील. कारण इस्लाम मनपरिवर्तन व समाजपरिवर्तन करण्याकरिता भौतिक संसाधनासोबत नैतिक चारित्र्याचे अत्युच्च आचरणसुद्धा अंमलात आणण्याचे आवाहन करतो. ज्या देशांमध्ये लोकशाही तंत्र आणि मतस्वांतत्र्य नाही तेथे सुद्धा एक श्रद्धावान मुस्लिम हे कार्य करु शकतो. डॉक्टर अब्दुल हमीद अबू सुलैमान आपले पुस्तक दहशतवाद आणि राजकीय संघर्ष "पृष्ठ ९४ वर लिहितात :-

एक व्यक्ती जर श्रद्धा, सकारात्मक व रचनात्मक विचारसरणी आणि नैतिक मूल्याधिष्ठित चारित्र्य स्वीकारील तर समाजपरिवर्तन करण्यात ती निश्चितच सफल होईल आणि असाच मुस्लिम "इस्लामी खिलाफत" स्थापित करण्याकरिता पायाचा दगड सिद्ध होईल."

देशातील अंतर्गत राजकीय मतभेदापोटी दहशतवादाचा अवलंब करणे इस्लामला मान्य नाही. दुर्दैवाने काही मुस्लिम देशात, कुरआनच्या खऱ्या शिकवणी आणि इस्लामी राजकीय व्यवस्थेच्या सखोल अभ्यासाअभावी, परस्पर विचारविनिमयाने चालणारे शासन प्रस्थापित करण्याचे महत्व समजले गेले नाही. हे महत्व त्यांना समजले असते तर दहशतवादाऐवजी विवेक आणि संघर्षाऐवजी परस्पर सहकार्याचा अवलंब त्यांनी केला असता.

प्रेषित मुहम्मद (स) यांनी आपापसातले मतभेद मिटविण्यासाठी दहशतवादाचा अवलंब करण्याची परवानगी कधीच दिली नाही; असे जेव्हां घडले, तेव्हां त्यावर तीव्र नापसंती दर्शवून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अशा कृत्यास "अज्ञान काळातील वाईट प्रवृत्ती" असे संबोधिले.

इस्लामचा इतिहास, इस्लामी परंपरा आणि इस्लामचा स्वभावविशेष ही साक्ष देत आहे की इस्लामने कधीच दहशतवादाची परवानगी दिली नाही. नैतिक बळाच्याच साह्याने इस्लामने महान क्रांती घडविली; म्हणून या महान क्रांतीस "सत्प्रवृत्त आणि शांततामय क्रांती" हेच शीर्षक देणे समर्पक ठरेल.

समारोप करताना मौलाना मौदूदी (रह) यांचे दोन शब्द येथे देणे उचित वाटते :-

फॅसिस्ट आणि साम्यवादी यांचा गुणधर्म दहशतवाद आहे; आणि इस्लामचा दहशतवादाशी दुरान्वये सुद्धा संबंध नाही. इस्लाम आपल्या मर्जीविरुद्ध काहीच सहन करु शकत नाही असा अपप्रचार सतत केला गेला आणि केला जात आहे. सध्याच्या तथाकथित प्रगत युगातच मतभेदाचा इलाज बंदुकीची गोळी किंवा दडपशाही समजला गेला आहे आणि नसत्या आरोपीला "गुन्हेगार" सिद्ध करण्याचे किती तरी वाममार्ग आजच्या संस्कृतीने शोधून काढले आहेत !" *(मौलाना मौदूदी (रह.)*

सारांश, बौद्धिक क्रांती आणि मन परिवर्तन घडविण्याकरिता इस्लाम मानवांना कुप्रवृत्ती पासून सत्प्रवृत्तीकडे वळविण्यासाठी प्रयत्नशील आहे, आणि हेच कार्य समस्त मानवजातिकरिता उपकारक ठरणार आहे.

## समाप्त